

महाराष्ट्राचे

# शिल्पकार

# दादासाहेब फाळके







बापू वाटवे



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# भारतीय चित्रपटसृष्टीचे जनक
# दादासाहेब फाळके

बापू वाटवे




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

प्रथमावृत्ती : नोव्हेंबर २००२
महाराष्ट्राचे शिल्पकार : क्र. १०

प्रकाशक :
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर, मुंबई ४०० ०१४



मुद्रक :
प्रमोद भोगटे,
स्नेहेश प्रिंटर्स,
३२०-ए, शाह अँड नाहर इंड. इस्टेट अ-१,
धनराज मिल आवार, सीताराम जाधव मार्ग,
लोअर परळ, मुंबई-१३. (दूरध्वनी : ४९४५६१५)

मुखपृष्ठ : राजा बडसल

किंमत : रु. ३५/-



# निवेदन

महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, आर्थिक व वैचारिक जडणघडणीत ज्या दिवंगत महनीय व्यक्तींचा महत्त्वपूर्ण सहभाग आहे अशा व्यक्तींची साधारणत: शंभर ते सव्वाशे पानांची सुबोध मराठी भाषेत चरित्र लिहून ती 'महाराष्ट्राचे शिल्पकार' या योजनेअंतर्गत पुस्तकरुपाने प्रकाशित करण्याची मंडळाने योजना आखली असून या चरित्र-ग्रंथमालेतील 'भारतीय चित्रपटसृष्टीचे जनक : दादासाहेब फाळके' हा दहावा चरित्रग्रंथ आहे.

केवळ महाराष्ट्राच्याच नव्हे तर भारताच्या सांस्कृतिक जीवनात दादासाहेब फाळके यांना अव्वल दर्जाचे स्थान आहे. दादासाहेब फाळके यांचा 'राजा हरिश्चंद्र' हा पहिला भारतीय चित्रपट ३ मे १९१३ रोजी प्रदर्शित झाला. १९१४ साली दादासाहेब विजेवर चालणारी उपकरणे खरेदी करण्यासाठी लंडनला गेले असता हेपवर्थ यांनी दादासाहेबांना 'इंग्लंडमध्ये भारतीय चित्रपट निर्माण करावे, कलावंत, तंत्रज्ञ भारतातून आणावे, त्या सर्वांचा प्रवास, निवास खर्च, मासिक वेतन, शिवाय फाळके यांना दरमहा ३०० पौंड पगार व नफ्यात २० टक्के हिस्सा' अशी योजना त्यांच्यापुढं मांडली. परंतु 'लोकरंजनाबरोबर लोकशिक्षण व्हावं, भारतीय संस्कृती स्वकीयांप्रमाणं परकीयांनाही ज्ञात व्हावी, हाच माझा ध्यास आणि हव्यास आहे. मी ही योजना स्वीकारली तर मी माझ्या ध्येयापासून, तत्त्वनिष्ठेपासून ढळेन म्हणून मी ही योजना स्वीकारू शकत नाही, याबद्दल क्षमा असावी' असे खऱ्या राष्ट्रभक्ताला शोभणारे उद्‌गार दादासाहेबांनी त्यावेळी काढले.

अशा या भारतीय चित्रपटसृष्टीच्या जनकाचे अखेरचे दिवस मात्र अतिशय वाईट गेले. भारतीय संस्कृतीचे खरेखुरे दर्शन घडेल असा विषय घेऊन चित्रपट निर्माण करण्याचा विचार दादासाहेबांच्या मनात आला. दुसऱ्या महायुद्धाचा तो काळ होता. फिल्मचा तुटवडा होता. चित्रपट निर्मितीसाठी सरकारी परवाना लागत असे. दादासाहेबांनी तसा अर्ज २६ जानेवारी, १९४४ रोजी परवान्यासाठी दिल्लीत सरकारी कार्यालयाकडे पाठवून दिला. परंतु १४ फेब्रुवारी रोजी दादासाहेबांना 'तुम्हाला परवाना देता येणार नाही' असे नकारात्मक पत्र आले. 'हेच फळ काय मम तपाला' असे म्हणण्याची पाळी दादासाहेबांवर आली. या आघातानं दादासाहेब खचले.

'दादासाहेब फाळके हे भारतीय चित्रपटसृष्टीचे जनक आहेत. भारतीय चित्रपटसृष्टीचा कुतुबमिनार हा दिमाखात उभा आहे. त्याची जडणघडण एका मराठी कलावंताने चाळीशी उलटल्यानंतर जवळ आर्थिक बळ अजिबात नसताना कशी केली तो सारा इतिहास रंजक, उद्‌बोधक आहे.' या चरित्र ग्रंथात हा इतिहास आहे त्याच पद्धतीने बापू वाटवे यांनी सांगितला आहे.

आपल्या उभ्या हयातीत श्रेयाचे वाटेकरू होण्याचे भाग्य दादासाहेबांना लाभले नाही हे खरे; पण त्यांच्या निधनानंतर आता नाशिकला त्यांचे भव्य स्मारक उभे राहिले आहे. तरीही त्यांच्या हयातीत त्यांची झालेली उपेक्षा मनात सलत राहते.

बापू वाटवे यांनी भारतीय चित्रपटसृष्टीच्या या जनकाचे चरित्र अतिशय साध्या, सोप्या भाषेत; पण प्रत्ययकारी पद्धतीने लिहिले आहे आणि म्हणूनच ते वाचनीय व उद्‌बोधक झालेले आहे.

**रा. रं. बोराडे**

अध्यक्ष

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

मुंबई

दिनांक: ८ नोव्हेंबर, २००२

# अनुक्रमणिका

# भारतीय चित्रपटसृष्टीचे जनक : दादासाहेब फाळके

भारतात आज दररोज १। कोट प्रेक्षक चित्रपट बघतात, ८७० हून अधिक वेगवेगळ्या भारतीय भाषेत सिनेनियतकालिकं प्रसिद्ध होतात, ५८ देशात चित्रपट निघतात, १०८ देशात भारतीय चित्रपट दाखविले जातात, गेली ३० वर्ष भारताचा चित्रपट निर्मितीत संख्येनं पहिला क्रमांक आहे, हजारो लोक या व्यवसायावर पोट भरतात. भारतीय चित्रपटसृष्टीचा कुतुबमिनार आज दिमाखात उभा आहे त्याची जडणघडण एका मराठी कलावंतानं चाळीशी उलटल्यावर जवळ आर्थिक बळ अजिबात नसताना कशी केली तो सारा इतिहास रंजक व उद्बोधक आहे.

वास्तविक चित्रपटाची कला आपण परकियांकडून घेतली. चित्रपटसृष्टी अस्तित्वात कशी आली तेही वाचनीय आहे. पुरातन काळी भारतात छायानृत्याचे प्रयोग करीत असत. दिव्याच्या प्रकाशाच्या साहाय्यानं, मध्यभागी लावलेल्या पडद्यावर पात्रांची हालचाल छाया स्वरूपात दिसे. चीन, जपानमध्येही छाया नृत्याचा प्रयोग अस्तित्वात होता, परंतु आपल्याकडील छायानृत्याच्या कथानकाला संवाद व संगीताची जोड होती. हा प्रकार चलत् चित्रपटासारखा वाटे. ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीत एके ठिकाणी 'रुपमाया' हा सार्थ शब्द वापरला आहे. त्याची उपमा या छायानृत्याला देता येईल.

वास्तविक स्थिर चित्र हालती-चालती दिसतील असा प्राथमिक अवस्थेतला पहिला प्रयोग १६४० सालीच रोम मधील एका संशोधकानं केला होता, पण या प्रयोगाला खरा वेग आला विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात. अमेरिका, फ्रान्स, ब्रिटन, जर्मनी इथल्या संशोधकांचे त्या दृष्टीनं प्रयत्न सुरू झाले होते.

१८७२ साली कॅलिफोर्नियाचा गव्हर्नर लेलँड ट्रान्सफोर्ड व त्याचे काही मित्र यांच्यात एक वाद उत्पन्न झाला. घोडा जेव्हां भरधाव पळतो तेव्हा

त्याचे चारही पाय क्षणिक वर उचलले जातात. ही वादाची वावटळ माईब्रिज या चित्रकाराच्या कानी गेली. त्यानं तथ्य जाणून घेण्यासाठी विचारपूर्वक २४ छायाचित्रांचे कॅमेरे लावून धावणाऱ्या घोड्याच्या मार्गावर आडवे धागे बांधले. त्याचं एक टोक शटरला जोडलं त्यामुळं घोड्याच्या पायानं धागे तुटून छायाचित्रं टिपली गेली. त्या २४ छायाचित्रांची माईब्रिजनं एक मालिका बनवून जात्यासारख्या तयार केलल्या लाकडी यंत्राच्या साहाय्याचं हँडल फिरवून सरकणारी चित्रमालिका छिद्रातून पाहताच घोडा गॅलपमध्ये धावताना त्याचे चारही पाय जमिनीपासून क्षणिक, अंतराळी उचलले जातात हे सिद्ध झालं. शिवाय घोड्याचं शेपूट हालताना दिसलं, ही चलत् चित्रपटाची पिंडरचना!

पण या पद्धतीनं एखाद्या दृश्यांची चलत् चित्रमालिका तयार करावयाची झाली तर शेकडो कॅमेरे व हजारो छायाचित्रं घ्यावी लागली असती हे लक्षात घेऊन अमेरिकेतील जॉर्ज ईस्टमनने सध्या अस्तित्वात असलेली सिनेफिल्म १८८९ साली तयार केली. त्याच वर्षी ब्रिटिश संशोधक विल्यम फ्रिज ग्रीननं या फिल्मचं चित्रण करता येईल असा कॅमेरा तयार केला. हा महत्त्वाचा टप्पा होता. एडिसननं तर कायनोटोग्राफ व कायनोटोस्कोप ही दोन स्वतंत्र यंत्र तयार केली. एकानं चित्रण करता येऊ लागलं व दुसऱ्यानं हँडल फिरवून फिल्मवरील हालचाल बघता येऊ लागली. मात्र या यंत्राच्या छिद्रातून एकावेळी एकालाच हे बघता येत होतं. अशी यंत्र दुकानात बसविलेली असत. चित्राची हालचाल बघून बघणारा थक्क होऊन जात असे. हँडलनं फिरविल्यामुळं चित्रांची गती कमी जास्त व्हायची पण चित्र हालतय हेच कौतुक होतं.

त्याचवर्षी म्हणजे १८८९ साली रेल्वेत नोकरीला असलेले कल्याणचे श्री. महादेव गोपाळ पटवर्धन यांनी मुंबईचे एक हरहुन्नरी इंजिनिअर मदनराव पितळे यांनी हौस म्हणून श्रीकृष्ण चरित्रातील काही भाग स्लाईड्सवर चितारला होता. त्या स्लाईडस् ते मॅजिक लँटर्नच्या साहाय्यानं दाखवीत. ते बघताना चलत् चित्रपट (मुव्ही) बघितल्याचा भास होत असे. हा एक लाभदायक व्यवसाय होऊ शकेल असं श्री. पटवर्धन यांना जाणवलं. त्या दृष्टीनं ते तयारीला लागले.

त्यांचा पुत्र विनायक यानं जे. जे. स्कूल ऑफ आर्टस्चा शिक्षणक्रम पुरा केला होता. काचेवर सुरेख, सुबक चित्रं काढण्यात विनायक तरबेज झाला व मॅजिक लँटर्नच्या साहाय्यानं चलत्‌चित्राचा आभास निर्माण करण्याची कला त्यानं आत्मसात केली. त्याचा धाकटा भाऊ रामचंद्र यालाही या

कला साध्य झाल्या. पटवर्धन बंधूंनी तीन मॅजिक लॅटर्नच्या साहाय्यानं स्लाईडस्वर स्वत: रंगविलेल्या चित्रांच्या पौराणिक कथानकावरील कार्यक्रम दाखवायला सुरुवात केली. चितारलेली ही चित्रं अत्यंत रेखीव, आकर्षक व प्रमाणबद्ध होती. सर्कस वरीलही एक अशा चित्रांचा ते कार्यक्रम करीत.

स्लाईडस् कौशल्यानं हव्या तशा मागंपुढं करून आपल्या खेळाला त्यानी अमरकोशातून योग्य शब्द काढून 'शांबरिक खरोलिका' असं नामाभिदान केलं होतं. सुमारे तीन तीन तासांचा एकेक खेळ असे. त्याला संवाद, संगीत, गाणी निवेदन यांचीही जोड दिली होती. त्यामुळं कार्यक्रम अतिशय रंगतदार होत असत. 'शांबरिक खरोलिका'चे हे कार्यक्रम १९२० सालपर्यंत म्हणजे भारतात चित्रपट निर्मिती सुरू झाल्यावरही सात-आठ वर्ष चालू होते. याचा अर्थ त्यांची लोकप्रियता तीस वर्ष टिकून होती. जगात हा कार्यक्रम अजोड आहे. त्यात वापरत असलेल्या स्लाईडस्च्या सहा पेट्या पटवर्धन कुटुंबियांनी पुण्यातल्या राष्ट्रीय चित्रपट संग्रहालयाला भेट म्हणून दिल्या आहेत. त्यांचे काही प्रयोग संग्रहालयानं केले आहेत. त्या घेऊन येण्यात माझा पुढाकार होता.

१८९५ साली एडिसननं बनविलेल्या व्हिटास्कोपमुळं टांगलेल्या पडद्यावर एकाचवेळी बऱ्याच प्रेक्षकांना चलत् चित्रपट बघता येऊ लागला. अर्थात हा चलत् चित्रपट काही सेकंदाचा असे. हा चलत् चित्रपटाचा पुढचा महत्त्वाचा टप्पा! फ्रान्सचे संशोधक ल्युमिए बंधूनीही चित्रीकरण व चित्रप्रक्षेपणही करता येईल अशी यंत्र बनविण्यात यश मिळविलं होतं. त्यांनी 'लंच अवर ॲट ल्युमिए फॅक्टरी' हा २० सेकंदाचा लघुपट तयार करून काही मंडळींना खासगीत दाखविला. त्याची उत्साहवर्धक प्रतिक्रिया पाहून ल्युमिए बंधूनी ५० फुटांचा 'चार्ज ऑफ दि ड्रॅगन' लघुपट तयार करून २५ डिसेंबर १८९५ रोजी पॅरिसच्या 'ग्रॅंड कॅफेत' तिकीट लावून जाहीररित्या दाखविला. हे जगातलं पहिलं चित्रपट प्रदर्शन. प्रारंभी ३५ प्रेक्षक उपस्थित होते. ती संख्या वाढत वाढत दोन हजारापर्यंत गेली. हा प्रतिसाद बघून ल्यूमिए बंधूनी असेच छोटे छोटे लघुपट तयार करून आपले प्रतिनिधी काही देशात पाठवून त्यांचं प्रदर्शन केलं.

त्यांचा एक प्रतिनिधी भारतात आला होता. त्यानं ७ जुलै १८९६ रोजी मुंबईत काळा घोडा जवळ आता एस्प्लनेड मॅन्शन आहे, त्यावेळी तिथं वॅटसन हॉटेल होतं; या हॉटेलात त्यानं पहिला खेळ केला. टाइम्स ऑफ इंडियात त्याची जाहिरात करण्यात आली होती. या शतकातील अजब शोध,

जगातील मोठं आश्चर्य, लाईफ साईजमधील जिवंत आकृतींच्या हालचाली पाहा. तिकीट १ रुपया ठेवण्यात आलं होतं. शंभर वर्षापूर्वी हे तिकीट महागडं होतं पण चित्रांची हालचाल हे नाविन्य असल्यानं कमालीचं कुतुहल होतं. म्हणून पहिले दिवशी दोनशे प्रेक्षक आले होते.

त्या दिवशी एक गम्मत झाली. चित्रांची हालचाल बघण्याची डोळ्यांना कधी सवय नसल्यानं रेल्वे इंजिन पडद्यावर जवळजवळ येत आहे हे बघताच ते अंगावर येईल असं वाटून काही प्रेक्षक घाबरून थिएटर सोडून पळाले तर काही खुर्चीच्या मागं लपले. बाहेर पळालेल्या प्रेक्षकांनी इंजिन निघून गेल्याची खात्री करून घेऊन मग ते परत आत आले. वॅटसन हॉटेलात एक आठवडाभर चलत् चित्रपटाचे खेळ चालू होते. त्यानंतर आत्ताचं मुंबईतील एक्सेलशिअर, त्यावेळचं नॉव्हेल्टी, या शेडवजा थिएटरात १४ जुलै ते १५ ऑगस्ट ऐन पावसाळ्याला ८ आण्यापासून ते २ रुपये तिकीट ठेऊनही हाऊसफुल गर्दीत खेळ चालले इतकं प्रेक्षकांना या छोट्या चलत् चित्रांनी आकर्षित केलं होतं.

या चलत् चित्रपटाचं स्वरूप तरी काय होतं? यातील प्रत्येक चित्रपट मिनिट-दीड मिनिटांचा असे. एकूण १२ चलत्चित्रपट दाखविले जात. मूल बागेत खेळतंय, ते आई वडिलांबरोबर न्याहरी घेतंय, घोडा धावतोय, मजूर भिंत बांधत आहेत, मजूर फॅक्टरीतून बाहेर पडत आहेत, नावाडी नाव वल्हवितो आहे, रेल्वेगाडी स्टेशनात येत आहे, समुद्राच्या लाटा उसळतात, वाऱ्यानं पालापाचोळा उडतोय, बागेत पाणी घालणाऱ्या माळ्याची एक मुलगा छेड काढतो, माळी त्याला धरायला धावतो. अशाप्रकारचे हे चलत् चित्रपट असत. यात कुणीही कलाकार, कथा, सेट वगैरे नव्हतं. सारं चित्रण जागेवरच केलेलं असे, चलत् चित्रपटांचा हा सर्व कार्यक्रम पंधरा-वीस मिनिटात संपत असे, पण चित्रांची हालचाल बघून प्रेक्षक मंत्रमुग्ध होऊन जात.

ल्यूमिए बंधूंच्या प्रतिनिधीनं वॅटसन हॉटेलात दाखविलेले चलत् चित्रपट मुंबईचे हरिश्चंद्र भाटवडेकर तथा सावेदादांनी पाहिले होते. ते पाहून सावेदादा इतके प्रभावित झाले होते की आपणही असा चलत् चित्रपट काढावा असं त्याना वाटू लागलं. त्यांनी ल्यूमिए बंधूंच्या यंत्रसामग्रीची एजन्सी घेतली होती. यंत्रसामग्री कशी वापरायची याचं प्रात्यक्षिक त्यांना गिऱ्हाईकाला समजावून सांगावं लागे, त्यामुळं त्यांना थोडीफार यांत्रिक माहिती झालीच होती. भाटवडेकरांचं फोटोग्राफी साहित्य विक्रीचं मुंबईत केनेडी ब्रिजजवळ दुकान होतं.

चलत् चित्रपट काढावयाचा विचार पक्का झाल्यावर सावेदादांनी लंडनहून सिने कॅमेरा मागविला. कॅमरे आल्यावर सावेदादांनी आवश्यक ती तांत्रिक माहिती करून घेतली व मुंबईच्या हँगिंग गार्डनमध्ये पुंडलिकदादा व कृष्णा न्हावी या दोन पहेलवानांच्या कुस्तीचं त्यांनी चित्रण केलं. परदेशातून त्यावर प्रक्रिया (प्रोसेसिंग) करून आणण्यात आली व मुंबईत पॅरी थिएटरमध्ये हा लघुपट १८९९ च्या अखेरीस म्हणजे शंभर वर्षांपूर्वी ३ रुपये. तिकीट लावून प्रदर्शित केला. हा लघुपट भारतात तयार झाला असल्यानं इतकं भारी तिकीट असून गर्दी झाली होती. सावेदादा हे भारतीय चलत् चित्रपटसृष्टीचे आद्य प्रवर्तक ठरले. पुढं सावेदादांनी माकडांचे खेळ, डोंबाऱ्याचे खेळ असे छोटेखानी लघुपटही तयार केले होते. १९०१ साली रँगलर र. पु. परांजपे रँगलरची पदवी संपादन करून परदेशातून स्वदेशी आले तेव्हा त्यांच्या आगमनाचा व त्यानंतर झालेल्या त्यांच्या सत्काराचा माहितीपट सावेदादानीच तयार केल होता. भारतात निर्माण झालेला हा पहिला माहितीपट! सावेदादांचा हा प्रयोग बघून कलकत्याच्या हिरालाल सेन व ज्योतीश सरकार यांनी चलत् चित्रपट तयार करण्याचे प्रयत्न सुरू केले. हिरालाल सेन यांच्या या प्रयत्नाची सविस्तर माहिती कलकत्त्याच्या १९३९ सालच्या 'दीपाली' या नियतकालिकात प्रसिद्ध झाली आहे. सेन यांनी १८९६ सालीच एक प्रोजेक्टर खरेदी केला होता. १९०० साली पॅथे या विदेशी कंपनीचा एक छायालेखक भारतात आला होता. त्यांच्याकडून सेननी छायालेखनाचे धडे घेतले. अल्पावधीत त्यांनी स्वतःच एक कॅमेरा तयार केला व १९०३ साली 'अलिबाबा' या लोकप्रिय नाटकातील नरेंद्रनाथ बॅनर्जी व कुसुमकुमारी यांच्या नृत्याचा भाग चित्रित केला. त्यावर्षीच सावेदादांनी एडवर्ड बादशहाचा दिल्ली दरबार चित्रित केला होता. असे छोटे छोटे लघुपट भारतात तयार होऊ लागले होते.

वर सावेदादांचा उल्लेख येऊन गेलाच आहे त्यांच्या मनात श्रीकृष्णावर चित्रपट काढायचं होतं. त्यांनी तयारीही चालविली होती. त्यांचे बंधू हे सावेदादांचे सहकारी होते. त्यांच्या अचानक मृत्यूनं सावेदादांना त्यात रस वाटेना म्हणून त्यांनी चित्रपट काढण्याचा विचार बदलला आणि आपला कॅमेरा त्यांचे तंत्रज्ञ स्नेही ए. पी. करंदीकर आणि व्ही. पी. दिवेकर यांना विकून टाकला.

एस. एन. पाटणकर हे एक त्यांचे तंत्रज्ञ स्नेही त्यांचे भागीदार होऊन या तिघांनी मिळून 'सावित्री' हा पौराणिक चित्रपट काढायचं ठरविलं. ही घटना १९१२ सालातील. हा चित्रपट पूर्णही झाला. विशेष म्हणजे तेव्हा

नाटक-सिनेमात काम करायला स्त्रिया मिळत नसत तरी यांना नर्मदा मांडे नावाची अहमदाबादची एक सुस्वरूप तरुणी सावित्रीच्या भूमिकेसाठी मिळाली होती. या मूकपटात बऱ्याच तांत्रिक चुका राहिल्या होत्या शिवाय प्रक्रियेत (प्रोसेसिंग) मध्येही घोटाळा झाल्यानं 'सावित्री' प्रदर्शित होऊच शकला नाही. कलकत्त्यालाही 'बिल्वमंगल' हा चित्रपट काढण्याचा प्रयत्न झाला होता पण भांडवलापायी हा चित्रपट अपूर्ण राहिला होता.

१९१२ सालातीलच घटना आहे. गिरगावात श्रीपाद संगीत नाटक मंडळी ही हौशीनाट्य संस्था होती. मुंबईच्या ग्रिव्हज कॉटन कंपनीत नोकरीला असलेल्या मालवणचे रामचंद्र गोपाळ तथा दादासाहेब तोरणे यांचा या नाट्य संस्थेशी परिचय होता. एखाद्या नाट्यप्रयोगाचं चित्रीकरण करून पाहावं असं त्यांना वाटू लागलं. ही हकीगत आहे. १९०६-०७ सालची. तंत्रज्ञान यांत्रिक-तांत्रिक अडचणी यामुळं मधे तीन वर्षं तशीच गेली. पुढं सर्व सोयी उपलब्ध झाल्यावर या नाट्यसंस्थेचं 'पुंडलिक' हे नाटक चित्रित करायचं ठरलं. १९०९ साली म्हणजे ३ वर्षांनी मुंबईत आता जिथं नाझ थिएटर आहे त्या मंगळदास वाडीत चित्रीकरण सुरू झालं. दिग्दर्शक अर्थातच दादासाहेब तोरणे! पण दिग्दर्शकाला फारसं कामच नव्हतं. यातील पात्रं नाटकाप्रमाणं एक्झीट एंट्री घेत व कॅमेऱ्यासमोर येऊन अभिनय करीत. कॅमेरा एकाच जागी स्थिर ठेवलेला असे.

यथावकाश चित्रीकरण पूर्ण झाल्यावर 'पुंडलिक' रासायनिक संस्कारासाठी परदेशात पाठविण्यात आला. कथानक असलेल्या या मूकपटाला पडद्यावर येण्यासाठी १९१२ साल उजाडलं तोवर मुंबईत आता जिथं पारेख हॉस्पिटल आहे तिथं सॅडहर्स्ट रोडला नानासाहेब चित्र्यांचं कॉरोनेशन थिएटर उभं राहिलं होतं. तिथं १८ मे १९१२ रोजी 'पुंडलिक' झळकला. त्या काळी आठवड्याला दोन विदेशी मूकपट दाखविले जात. परंतु पुंडलिक २ आठवडे चालला. प्रेक्षकांचा प्रतिसादही भरपूर मिळाला, पण त्याकाळी भारतात वितरण व्यवस्था नसल्यानं 'पुंडलिक' फक्त मुंबईतच दाखविला गेला, त्यामुळं त्याला हवी तेवढी प्रसिद्धी मिळू शकली नाही, शिवाय यात नाविन्याखेरीज इतर उल्लेखनीय असं काहीही नव्हतं, याला चित्रपटाचं कोणतही तंत्र नव्हतं, नाटकाचं सरळसरळ चित्रीकरण केलं होतं. तंत्रज्ञ परदेशी यांवर प्रक्रिया व प्रिंटिंगही लंडनहून करून आणल्यानं भारतीय चित्रपट सृष्टीच्या जनकत्वाचा मान या दादासाहेबांना न मिळता त्या दादासाहेबांना म्हणजे त्र्यंबकेश्वरच्या दादासाहेबांना म्हणजे धुंडिराज गोविंद फाळके यांना मिळाला.

दादासाहेब फाळक्यांचा जन्म ३० एप्रिल १८७० रोजी नाशिकपासून २९ कि.मी. असलेल्या त्र्यंबकेश्वर या तीर्थक्षेत्री झाला. वडील गोविंद सदाशिव तथा दाजीशास्त्री वेदशास्त्र संपन्न होते. ते भिक्षुकीचा व्यवसाय करीत होते. दाजीशास्त्रींनी मंदिरातील पुराणिकाचा पेशा पत्करल्यानं याज्ञिकी, वैद्यकी, हव्यकव्यादी बरोबर महाभारत, रामायण, भागवत, वेद, उपनिषद, आदी दादासाहेबांना वडिलांच्या नित्य सहवासानं मुखोद्गत झाली होती. दादासाहेबांवरील बालपणच्या या संस्काराचं प्रतिबिंब त्यांच्या चित्रपटातून दिसत असे.

दाजीशास्त्री संस्कृत भाषेचे गाढे पंडित असल्यानं मुंबईच्या विल्सन कॉलेजमध्ये ते पदवीधर नसूनही संस्कृतचे प्राध्यापक म्हणून त्यांची नियुक्ती झाली होती. त्यामुळं फाळके कुटुंब मुंबईला गेलं. दादासाहेबांनी संस्कृत पंडित होऊन आपला पेशा पुढं चालवावा अशी वडिलांची इच्छा होती. पण दादासाहेबांची मनीषा चित्रकार होण्याची होती. त्यांना चित्रकलेची निसर्गदत्त देणगीच होती. दिवाळीत ते आकर्षक रांगोळ्या काढीत, गौरी गणपतीत कलात्मक मखरं करणं, देखणी आरास करणं हे काम मोठ्या हौसेनं करीत. पुढं श्रीगजाननाच्या मोहक मूर्तीही ते करू लागले. त्यांची आवड लक्षात घेऊन त्यांनी आपली इच्छा दादासाहेबांच्यावर न लादता त्यांचं नाव १८८५ साली मुंबईच्या जे. जे. स्कूल ऑफ आर्टस् मध्ये घातलं. या संस्थेच्या स्नेहसंमेलनाच्या नाटकात त्यांनी रंगभूमीवर प्रथम भूमिका केली. हौशी कलावंत म्हणून त्यांनी हौशी रंगभूमीवर काही नाटकात उत्तम भूमिका केल्या होत्या. एक वर्षाचा जे. जे. स्कूल ऑफ आर्टस्च्या चित्रकलेचा शिक्षणक्रम त्यांनी पूर्ण केला.

त्यानंतर दादासाहेबांचे थोरले बंधू शिवरामपंत यांनी दादासाहेबांना बडोद्याला नेलं व त्यांचं नाव बडोद्याच्या सुप्रसिद्ध कलाभवन मध्ये घातलं. तिथं दादासाहेबांच्या जन्मजात विविध कलांचा विकास झाला. १८९० साली दादासाहेबांनी ऑईल पेंटिंग व वॉटर कलरचा शिक्षणक्रम पूर्ण केला. सृष्टीचे देखावे चितारण्याचा त्यांना छंदच लागला.

त्याच वर्षी दादासाहेबांनी छायाचित्रणाचा एक कॅमेरा खरेदी केला व कलात्मक छायाचित्र कसं घ्यायचं? त्याचा त्यांची छायाचित्रं म्हणजे वस्तुपाठच असे. त्यावर प्रोसेसिंग, प्रिंटिंग स्वतःच प्रयोग करून शिकत होते. निरनिराळ्या कला आत्मसात करण्यात ते इतके रंगून आणि रमून गेले होते की त्यांनी एका नाट्यगृहाची प्रतिकृती इतकी सुबक व प्रमाणबद्ध केली होती की

१८९२ च्या अहमदाबादच्या औद्योगिक प्रदर्शनात दादासाहेबांना सुवर्ण पदक बहाल करण्यात आलं होतं. अशी सुवर्ण व रौप्य पदकं दादासाहेबांनी त्यांच्या वेधक कलाकृतीबद्दल वेळोवेळी संपादन केली होती.

कलाभवनचे प्राचार्य श्री. गज्जर यांची या हरहुन्नरी विलक्षण हुशार विद्यार्थ्यांवर इतकी मर्जी बसली की त्यांनी त्याला कलाभवनचा फोटो स्टुडिओ व रसायन शाळा वापरण्याची मुभा दिली, मग दादासाहेब या कामात दिवसदिवस रमू लागले. त्यांनी स्वत:चा फाळके फोटो स्टुडिओ सुरू केलाच होता. ते काम इतकं दर्जेदार करायचे की त्या तोडीचं काम तेव्हां विदेशी छायाचित्रकार मि. रेम्हेच करू शकत होता. परदेशियांनी दादासाहेबांच्या छायाचित्रातील कलात्मकता, कल्पकता, प्रिंटिंगचं कसब यांची मनसोक्त प्रशंसा केली होती.

त्याच सुमारास बडोदा कॉलेजनं 'वेणी संहार' या संस्कृत नाटकाची जबाबदारी दादासाहेबांच्यावर सोपविली. कलावंताना अभिनय शिकविणं, त्यांच्याकडून संवाद म्हणवून घेणं, या खेरीज त्यांची रंगवेशभूषाही दादासाहेबानीच केली होती, शिवाय प्रॉम्टिंगचं कामही दादासाहेबानीच केलं. मौलाबक्ष म्युझिकल स्कूलमध्ये दादासाहेबांनी शास्त्रोक्त संगीताचे धडेही घेतले. त्यामुळं ते कीर्तनही करू लागले. त्यात अभिनय, संगीत, कथा खुलवून, रंगवून सांगणं आलंच. त्यावेळी त्यांच्या मनात चित्रपटनिर्मितीचा विचारही नव्हता. पण पुढं तो व्यवसाय करायचं ठरविल्यावर या कला त्यांना उपयोगी पडल्या.

दादासाहेबांनी गोध्र्याला फोटोग्राफर म्हणून व्यवसाय सुरू केला होता. कॅमेरा माणसाच्या शरीरातील शक्ती खेचून घेतो व थोड्याच दिवसात माणूस मरतो असा अपसमज तिकडं अज्ञानामुळं पसरला व दादासाहेबांना व्यवसाय बंद करावा लागला. ते परत बडोद्याला आले व छायाचित्रणाच्या व्यवसायाबरोबर प्रा. शंकर मोरेश्वर रानडे यांच्याकडून नाट्यकला व नाट्यनिर्मितीची त्यांनी संपूर्ण माहिती घेतली. प्रा. रानड्यांनी 'विंटर्स टेल' व सिबलाईन' या शेक्सपिअरच्या नाटकात त्यांच्याकडून नायकाच्या भूमिका करून घेतल्या.

नाटकात रंगभूषा-वेशभूषा करण्यात तर दादासाहेब तरबेज झालेच. दादासाहेब हौशी कलावंताना अभिनय कसा करावा याचं प्रात्यक्षिकासह शिक्षणही देऊ लागले. बाहेरच्या नाट्यसंस्थेचा एखादा कलावंत ऐनवेळी येऊ शकला नाही तर दादासाहेब त्याच्या ऐवजी काम करून वेळ निभावून नेऊ लागले, निर्मात्यानं विनंती केली तर दिग्दर्शन, लेखन, नेपथ्य यात

सहकार्य करू लागले, वेळप्रसंगी पडदेही रंगवून देत. मुद्राभिनय कसा असावा हे नवोदित कलावंताना कळावं म्हणून विदेशी कलाकारांच्या वेगवेगळ्या भावमुद्रा असलेली छायाचित्रं आपल्या फोटो स्टुडिओत मुद्दाम लावून ठेवली होती.

त्यावेळी बडोद्याला एक जर्मन जादूगार आला होता. नवीन कला संपादन करण्याची दादासाहेबांना हौस होतीच. त्या जादूगाराशी मैत्री करून त्यांनी ही कलाही हस्तगत करून घेतली. त्याचा उपयोग त्यांना चित्र चमत्कृती (ट्रिक फोटोग्राफी) साठी पुढं झाला. दादासाहेब जाहीररित्या प्रो. केल्फा (फाळके या आडनावाचा उलटक्रम) प्रयोग करीत. त्याला भरपूर लोकप्रियताही मिळाली होती. ही हकीगत १९०१ सालची.

काहीतरी स्थैर्य हवे म्हणून दादासाहेबांनी सरकारी पुरातत्व विभागात छाया चित्रकार व ड्राफ्टस्मन म्हणून नोकरी धरली. या नोकरीत त्यांना भारतभर भ्रमण करावं लागे त्याचा त्यांना पुढं मोठा फायदा झाला. भारताच्या पुरातन काळातील ऐश्वर्याचा व प्राचीन वास्तुशिल्पाचा त्यांना कलात्मक दृष्टीकोनातून अभ्यास करता आला आणि त्यांना एक नवीन दृष्टी प्राप्त झाली. त्यांनी कितीतरी मंदिर, लेणी, घाट, पाषाणातील स्तिमित करायला लावणारं कोरीव काम आदीची जाणिवपूर्वक छायाचित्रं घेऊन ठेवली

दादासाहेबांचं कलासक्त मन नोकरीत रमेना. १९०५ साली झालेल्या वंगभंगाच्या चळवळीचा त्यांच्या निस्सीम देशभक्त मनावर फार मोठा परिणाम झाला. त्यांची नोकरी सुस्थिर होती पण या कारणास्तव १९०६ साली, चार वर्षानंतर त्यांनी नोकरीला राजिनामा दिला व त्यांच्या स्वाभिमानी, ध्येयनिष्ठ मनानं स्वतंत्र औद्योगिक व्यवसायाचा ध्यास घेतला. छपाईचीही कला त्यांनी बडोद्याला शिकून घेतली होती त्याचा त्यांना उपयोग झाला. दादासाहेबांनी लोणावळ्याला, फाळके एनग्रेव्हिंग अ‍ॅड प्रिंटिंग वर्क्सची स्थापना केली.

'राष्ट्रमत' या वृत्तपत्रात लोकमान्य टिळकांसारख्या महापुरूषांची छायाचित्र प्रसिद्ध होत. क्रांतीकारकांच्या व राष्ट्रीय नेत्याच्या छायाचित्रांचे ब्लॉक्स व छपाई धाडसानं करण्यामुळं त्यांना वेळीअवेळी होणाऱ्या चौकशीला न डरणाऱ्या दादासाहेबांनी आपली दृष्टी तिरंगी छपाईकडं वळविली. वाढता व्याप लक्षात घेऊन दादासाहेबांनी आपली संस्था लोणावळ्याहून दादर मेनरोडला हालविली. पुरूषोत्तम विश्राम मावजी नावाचे एक धनाढ्य भागीदार मिळाले. नव्या छापखान्याचं 'लक्ष्मी आर्ट प्रिंटिंग वर्क्स' असं नामाभिदान करण्यात आलं. १९०९ सालात दादासाहेब जर्मनीला जाऊन रंगीत छपाईचं तंत्रज्ञान शिकून

आले. दादासाहेब ज्या क्षेत्रात गेले तिथं त्यांनी अव्वल स्थान मिळविलं. त्यांच्या इतकी उत्कृष्ट रंगीत छपाई फक्त टाइम्स ऑफ इंडिया याच प्रेसमध्ये होऊ शकत होती, विदेशी नियतकालिकांनीही दादासाहेबांच्या रंगीत छपाईची प्रशंसा केली होती.

पण कलात्मक दृष्टी असलेल्या दादासाहेबांचं धंदेवाईक दृष्टी असलेल्या भागीदाराशी जमेना. दादासाहेब तसं कुणाचं वर्चस्व खपवून घेणारे नव्हते. त्यांनी एक पैसाही न घेता एके दिवशी लक्ष्मी आर्ट प्रिंटिंग वर्क्सची भागीदारी सोडली. हे कळताच बडेबडे धनिक दादासाहेबांनी नवीन प्रिंटिंग प्रेस काढावी म्हणून त्यांच्या दारी थैल्या घेऊन आले. दादासाहेबांनी त्यांना स्पष्ट सांगितलं, ज्या व्यवसायातून मी बाहेर पडलो त्याला स्पर्धक होणार नाही.

नातेवाईक, हितचिंतक यांनी दादासाहेबांना पुष्कळ सांगून पाहिलं पण त्यांनाही याचप्रमाणं ते उत्तर देत होते. घरची परिस्थिती साधारण होती, पुढील काहीही योजना नसताना त्यांनी भागी तोडली होती. दादासाहेब उद्विग्न मन:स्थितीतच होते. इथून त्यांच्या कसोटीचा काळ सुरू झाला व त्यातूनच भारतीय चित्रपटसृष्टी जन्माला आली!

वाचन, नाटकं पाहणं चालूच होतं. पुढं काय करायचं ठरत नव्हतं. रोज सायंकाळी आपला मुलगा भालचंद्र (बाबाराय) याला घेऊन दादासाहेब फिरायला जायचे. असेच चिंताक्रांत मन:स्थितीत फिरत फिरत गिरगाव बॅक रोडला गेले, तिथं इंडोअमेरिकन हे तंबूवजा थिएटर सुरू झालं होतं. तिथं विदेशी बहुश: अमेरिकन चित्रपट दाखवीत. दादासाहेब वेळ घालवायला म्हणून त्या थिएटरमध्ये गेले. रात्री घरी गेल्यावर भालचंद्रनं आईला सांगितलं, ''आई, आम्ही आज पडद्यावर हालती चालती माणसं, प्राणी बघितले, खूप मजा आली''

सरस्वतीबाईंनी दादासाहेबांना विचारलं, ''काय दाखवायला घेऊन गेला होतात तुम्ही त्याला?''

''दादासाहेब म्हणाले, ''तुला बघायचंय का? उद्या तुलाही घेऊन जातो.''

दुसरे दिवशी दादासाहेब सरस्वतीबाईंनाही सिनेमा दाखवायला घेऊन गेले. इस्टरमुळं त्यादिवशी 'दि लाईफ ऑफ खाइस्ट' हा येशू ख्रिस्ताच्या जीवनावरील चित्रपट दाखविला जात होता, तो बघताना दादासाहेबांच्या मनात आलं आपल्या देशात असे चित्रपट का तयार होऊ नयेत? आपले प्रेक्षक असे हे पाश्चिमात्य चित्रपट बघतात, भारतीयांना तसेच पाश्चिमात्यांना आपल्या संस्कृतीचे दर्शन कसे घडणार? ते घडलं पाहिजे. चित्रपट हे सर्वात प्रभावी माध्यम आहे.

आपल्याकडं हवी तेवढी पौराणिक, ऐतिहासिक, सामाजिक, रंजक तशीच उद्‌बोधक कथानक आहेत. ती पडद्यावर आली तर प्रेक्षकांवर योग्य संस्कार होऊ शकतील. स्वातंत्र्याच्या मंत्र देता येईल. म्हणजे हा व्यवसाय स्वदेशी व्हायला हवा. कुणीतरी तो करायला पाहिजे.

विचार करता करता दादासाहेबांना वाटलं कुणी करील म्हणून आपण वाट कशाला बघायची? आपणच करू. त्यांच्या मनात हे आलं मात्र त्यांना येशूऐवजी श्रीकृष्ण आणि मेरीऐवजी यशोदा दिसू लागली. घरी जाताना सरस्वतीबाईनी दादासाहेबांना विचारलं, ''ही चित्रं हालतात कशी हो?''

दादासाहेब लगेच उद्‌गारले ''हे सर्व तुला आपोआप कळेल, कारण हा चालत्या हलत्या चित्रांचा धंदा आपण लवकरच सुरू करणार आहोत. ख्रिस्ताच्या जागी श्रीकृष्ण दाखवायचाय, श्रीराम, अयोध्या, गोकुळ दाखवायचं आहे.''

हे ऐकून सरस्वतीबाई आवाक्‌ झाल्या. तो १५ एप्रिल १९११ हा दिवस. भारतीयांच्या पर्यायानं चित्रपटसृष्टीच्या इतिहासात क्रांतीकारक दिवस होता. सरस्वतीबाईना हे लक्षात येईना की जवळ पैशाचं पाठबळ नाही, दादासाहेबांची चाळीशी उलटली आहे यांना कसं जमणार आहे? पण त्या काही बोलल्या नाहीत.

चित्रपट व्यवसाय स्वदेशी करण्याच्या कल्पनेनं दादासाहेब फाळके झपाटले गेले होते. त्यादृष्टीनं ते उद्योगाला लागले. एका इंग्लीश कंपनीतून एक टॉय सिनेमा व फिल्मस्‌च्या काही माळा त्यांनी विकत आणल्या. मेणबत्तीच्या उजेडात रात्रीच्या वेळी फोर्टमधून आणलेल्या हातानं चालवायच्या छोट्या प्रोजेक्टरच्या लेन्सवर टाकून भिंतीवर सिनेमा दाखवायचे प्रयोग सुरू झाले. चित्रपट तंत्राविषयी एखादं पुस्तक मिळविण्यासाठी दादासाहेबांनी फोर्टमधील फोटोग्राफीसंबंधीची व इतर दुकानं धुंडाळली; परंतु व्यर्थ! शेवटी धोबी तलाव विभागातील नाडकर्णी आणि कंपनी या दुकानात 'एबीसी गाईड टु सिनेमा' हे एक पुस्तक मिळालं. या पुस्तकात उपयुक्त ठरेल अशी फारशी माहिती मिळाली नाही; तरी यंत्रसामग्रीसंबंधीच्या जाहिराती त्यात असल्यानं त्या दृष्टीनं हे पुस्तक दादासाहेबांना महत्त्वाचं वाटलं.

रात्री भिंतीवर सिनेमा बघणं चालू होतंच शिवाय अभ्यास म्हणून चित्रपटगृहात जाऊन सिनेमा बघणंही चालू होतं. त्यामुळे त्यांना फारतर तीन तास झोप मिळत होती. हा उपक्रम बरेच दिवस चालू राहिल्यानं डोळ्यावर अतोनात ताण पडला आणि दादासाहेबांना एकाएकी दिसेनासं झालं. आता

चित्रपट व्यवसाय स्वदेशी करण्याचं स्वप्न विरून जाणार या विचारानं दादासाहेब अतिशय निराश झाले. आकाशातील तारा होता आलं नाही तरी घरचा दिवा होऊन घर तरी उजळू दे एवढीच त्यांची परमेश्वराजवळ प्रार्थना होती.

परमेश्वरानं त्यांची प्रार्थना ऐकली, दादासाहेबांच्या आणि भारताच्या सुदैवानं मुंबईत डॉ. प्रभाकर हे नेत्रविशारद होते. त्यांनी दादासाहेबांना पुन्हा दृष्टी प्राप्त करून दिली; पण त्यांनी दादासाहेबांना सल्ला दिला की डोळ्यावर ताण पडेल असं आता काही करू नका. जर आता दृष्टी गेली तर पुन्हा ती प्राप्त करून देणं कठीण होईल.

चित्रपट व्यवसाय स्वदेशी करण्याचा ध्यास घेतलेल्या दादासाहेबांना कुठलं स्वस्थ बसवायला? चित्रपट, नाटकं पाहणं, विलायतेहून मागविलेले कॅटलॉग्ज, इतर वाचन सुरू केलं. कुणाचाही सल्ला मानण्याच्या मन:स्थितीत ते नव्हते आणि ते त्यांच्या स्वभावातच नव्हतं. हाती घेतलेलं काम पूर्ण होईपर्यंत त्याना स्वस्थता मिळत नव्हती, मग ते घरची, स्वत:ची कसलीच काळजी करीत नसत. त्यांच्या हितचिंतकांना त्यांच्या डोक्यावर परिणाम झाला आहे अशी शंका येऊ लागल्यानं त्यांना ठाण्याच्या वेड्याच्या इस्पितळात पाठविण्याची योजना होती असं स्वत: फाळक्यानीच लिहून ठेवलं आहे.

लंडनला जाऊन तांत्रिक ज्ञान घेतलं पाहिजे असं दादासाहेबांना वाटायला लागलं म्हणून ते स्वदेशी चळवळीच्या नेत्यांना भेटले, त्यांना आपली योजना समजावून सांगितली की हा सिनेव्यवसाय स्वदेशी होणं आवश्यक आहे. विदेशीयांची संस्कृती भारतीयांना त्यांच्या चित्रपटातून दिसते. वास्तविक भारतीय पुरातन आहे, थोर आहे याचं दर्शन बांधवांना व्हायला पाहिजे एवढंच नव्हे तर परदेशियांना देखील भारतीय संस्कृतीचा परिचय होणं आवश्यक आहे; याशिवाय हळूहळू चित्रपट व्यवसायात अनेकांना काम मिळेल यासाठी माझी सारी धडपड आहे याचा विचार व्हावा; परंतु दादासाहेबांची चाळीशी उलटलेली, जवळ फुटकी कवडी नाही, तंत्रज्ञान केवळ वाचनानं मिळवलेलं अशी व्यक्ती कितीही हुशार असली तरी अनुभव सिद्ध तंत्रज्ञांशी स्पर्धा कशी करणार? या विचारानी त्यांना कुणीच प्रोत्साहन, प्रतिसाद दिला नाही, पण ज्याला आपलं कार्य पुरं करायचं त्याला हताश होऊन चालत नाही.

तंत्रज्ञान संपादन करण्यासाठी परदेशात जायचं तर पैसा कसा उभा करावा? हा दादासाहेबांपुढं मोठाचा प्रश्न होता. कुठूनही आर्थिक मदत मिळण्याची शक्यता नव्हती. १९१२ च्या जानेवारीत नाडकर्णी आणि कंपनीचे मालक यशवंतराव नाडकर्णी यांच्याशी बोलताना दादासाहेबांनी स्वदेशी चित्रपट

निर्मितीची कल्पना त्यांना सांगितली. छायाचित्रणातील दादासाहेबांच्या कल्पकतेबद्दल व कौशल्याबद्दल त्यांना आदर होता. दादासाहेबांनी मनावर घेतलं तर ते आपलं स्वप्न पुरं करू शकतील याची नाडकर्णींना खात्री वाटत होती.

नाडकर्णींनी दादासाहेबांना दहा हजार रुपये कर्जाऊ द्यायची तयारी दाखविली; पण दादासाहेबांजवळ तारण द्यायला काहीच नव्हतं. मग त्यांनी १२ हजाराची विमा पॉलिसी तारण म्हणून नाडकर्णींच्याकडं गहाण टाकली आणि ते दहा हजार रुपये मिळताच त्यांनी लंडनला जायची तयारी सुरू केली. हे समजताच 'दादासाहेबांचं हे मृगजळामागं धावणं आहे' अशी टीका सुरू झाली. हे पैसे संपले की उदरनिर्वाहासाठी भिक्षांदेही करावी लागेल असंही काहीनी सरस्वतीबाईना बोलून दाखविलं तेव्हा 'ज्या अडचणी येतील, संकटं ओढवितील ती सोसायची माझी तयारी आहे.' असं स्पष्ट सांगून सरस्वतीबाईनी त्याना निरुत्तर केलं. सर्व तयारी झाल्यावर १ फेब्रुवारी १९१२ रोजी लंडनला जाण्यासाठी बोटीवर प्रस्थान ठेवलं.

दादासाहेब शाकाहारी होते, त्यामुळं लंडनमध्ये भोजनाचा प्रश्न होता, परंतु सुदैवानं मि. अब्दुल्ला नावाच्या महाराष्ट्रीय मुस्लीम मालकानं त्यांना आपल्या हॉटेलात शाकाहारी भोजनाची सोय करून दिली. दादासाहेबांनी त्याला येण्याचा हेतू सांगितला तो ऐकून तो मालक त्यांना वडीलभावाचा मान देऊ लागला.

भोजनाचा प्रश्न सुटला होता. दादासाहेब मग आपल्या कामाला लागले. लंडनमधील पिकॅडली सर्कस विभागात त्यांना 'बायोस्कोप सिने विकली' ही पाटी दिसली. दादासाहेब त्या सिनेसाप्ताहिकाचे वर्गणीदार होते. ते संपादक मि. केपबर्न यांना भेटले. आपला भारतातील वर्गणीदार भेटल्याचा केपबर्नना फार आनंद झाला. दादासाहेबांनी आपला लंडनला येण्याचा हेतू स्पष्ट केला. ते ऐकून घेतल्यावर मि. केपबर्न यांनी दादासाहेबांना हे धाडस न करण्याचा सल्ला दिला. त्यांचं म्हणणं इंग्लंडमधेच बरेच निर्माते अयशस्वी झाले आहेत व त्यातील बहुतेक रखडताहेत, याशिवाय फिल्मच्या दृष्टीनं भारतातील हवाही अनुकूल नाही.

दादासाहेबांनी निग्रहपूर्वक सांगितलं की, केलेल्या अभ्यासावरून भारतातील हवेचा काहीही परिणाम फिल्मवर होणार नाही आणि हा व्यवसाय स्वदेशी करण्यासाठी येतील त्यावर मात करण्याची माझी जिद्द आणि आत्मविश्वास आहे, एवढं सांगून दादासाहेबांनी पुस्तकं वाचून मिळविलेल्या तंत्रज्ञानावर

मि. केपबर्नशी चर्चा केली.

दादासाहेबांचं रुबाबदार व्यक्तिमत्व, छाप पडेल अशी बोलण्याची त्यांची पध्दत, ते पूर्ण शाकाहारी आहेतच शिवाय त्यांना धूम्रपानाचंही व्यसन नाही हे सगळं कळल्यावर दादासाहेबांविषयी मि. केपबर्नचं त्यांच्याविषयी अतिशय अनुकूल मत झालं. प्रभावीत झालेल्या केपबर्ननी दादासाहेबांना शक्य तेवढं सहकार्य देण्याचं वचन दिलं. एवढ्यावरच ते थांबले नाहीत तर वॉल्टन येथील प्रसिद्ध निर्माते सेसिल हेपवर्थ यांच्याशी संपर्क साधून फाळक्यांना सर्वतोपरी मार्गदर्शन करण्याची विनंती केली.

याचा इष्ट तो परिणाम होऊन रेल्वे स्टेशनवर निर्माता सेसिल हेपबर्थ स्वत: गाडी घेऊन आला होता. स्टुडिओतील सर्व खाती व त्यांचं कामकाज कसं चालतं हेही हेपबर्थनं दादासाहेबांना दाखविलं जे इंग्लंडवासीयालाही बघायला मिळत नव्हतं. हेपबर्थनं कलावंत व तंत्रज्ञ यांना बोलावून चित्रीकरण कसं चालतं याचं प्रात्यक्षिक करून दाखवायला सांगितलं.

हेपबर्थनं चित्रीकरणासाठी कोणता कॅमेरा घ्यावा? याचा तर सल्ला दिलाच आणि फिल्म प्रिंटिंग मशीन, तसेच फिल्मच्या कडांना आत्तासारखी भोकं नव्हती ती पाडावी लागत. ते यंत्र कुठून व कोणतं घ्यावं हेही सांगितलं. नवीन खरीदलेल्या कॅमेऱ्याची चाचणी करून बघण्यासाठी थोडसं चित्रीकरण करून बघण्याचीही मान्यता दिली. यंत्रसामग्रीचा वापर कसा करावा हेही समजावून सांगितलं. फाळक्यांची ही भेट मि. केपबर्ननी आपल्या 'बायोस्कोप'च्या २८ मे १९१४ च्या अंकात नमूद केली आहे.

दादासाहेबांचं वास्तव्य लंडनमध्ये दोन आठवडे होतं. त्या अवधीत लंडन सेलिंग कार्पोरेशननं तयार केलेला 'अ डॉटर ऑफ भारत' हा चित्रपट त्यांच्या पाहण्यात आला. हा भारतीय जीवनावरचा होता. नायिकेचं यातलं नाव होतं मिसेस पंडिता व नायकाचं नाव होतं मिस्टर रमाबाई. नायिकेचा पेहराव होता बूट, पायजमा व डोक्यावर पदर असा धेडगुजरी तर नायकाचा पेहराव होता फेजकॅप, दाढी असा. त्या चित्रपटात भारतीयांची नालस्ती केली असल्यानं हा चित्रपट पाहून कुठल्याही भारतीयाला चीड आली असती.

या चित्रपटाबद्दल दादासाहेबांनी मि. केपबर्नजवळ नापसंती व्यक्त केली व सांगितलं, ''भारत व भारतीय संस्कृती, चालीरीती या विषयी मिशनरींनी इकडं भलत्यासलत्या कल्पना करून दिलेल्या दिसताहेत. पुढील वर्षी माझा भारतीय बनावटीचा चित्रपट घेऊन मी इकडं येईन त्यात इथल्या लोकांना भारताचं खरंखुरं दर्शन घडेल.''

मि. केपबर्न व निर्माता सेसिल हेपबर्थ यांचे शतशः आभार मानून दादासाहेब १ एप्रिलला भारतात परतले. निघण्यापूर्वी कोडॅक कंपनीला कच्च्या फिल्मची ऑर्डरही दिली. त्या काळाला अनुसरून परदेशात जाऊन आल्यानं दादासाहेबांना शुद्धीकरण करून घ्यावं लागलं होतं.

☆

# पहिल्या भारतीय चित्रपटाचा जन्म!

दादासाहेब भारतात परतल्यावर चित्रीकरणासाठी त्यांना प्रशस्त जागा हवी होती. दादासाहेबांचे लक्ष्मी प्रिंटिंग आर्ट वर्क्सचे भागीदार मकनजीनी छापखाना दादरच्या मथुराभवनातून भायखळ्याच्या साखळी स्ट्रीटवर नेला असल्यानं त्यांचा दादरचा बंगला रिकामा होता म्हणून दादासाहेब आपल्या पूर्वीच्या भागीदाराला भेटले. दादासाहेब एक छदामही न घेता त्यांनी भागी सोडली होती. एवढच नव्हे तर ते या व्यवसायात आपल्याला स्पर्धक झाले नाहीत हा त्यांच्या मनाचा मोठेपणा शेटजींच्या ध्यानात होता. दादासाहेबांची कल्पकता, त्यांची अथक परिश्रम करण्याची सिध्दता लक्षात घेऊन शेठजींनी आपला दादरचा बंगला आनंदाने त्यांच्या स्वाधीन केला.

दादासाहेबांनी इंग्लंडहून परतताना पहिल्या भारतीय चित्रपटाचा विषय विचारांती निश्चित केला होता. पुण्यश्लोक राजा हरिश्चंद्राचा कथाभाग पडद्यावर आणायचं त्यांनी ठरविलं होतं. या विषयावरील हिंदी, उर्दू, गुजराथी भाषेतील नाटकं जोरात चालली होती हेही एक कारण होतच. मूकपट असल्यानं राजा हरिश्चंद्राची आदर्श कथा भारतभर समजायला भाषेची अडचण नव्हती.

१९१२ सालच्या मे महिन्यात दादासाहेबांनी इंग्लंडमध्ये खरीदलेली यंत्रसामग्री मुंबई बंदरावर आली. तोवर दादासाहेबांनी घरीच डार्करुम व फिल्मवर प्रक्रिया (प्रोसेसिंग)ची व्यवस्था करून ठेवली होती. आलेली यंत्रसामग्री घरच्या मंडळींनी साफसूफ केली. नकाशाप्रमाणं दादासाहेबांनी ती जोडली. नोकरवर्ग कुणी नव्हताच. फिल्मला डार्करुममध्ये अंधारात भोक पाडण्याचं किचकट जिकिरचं काम दादासाहेबांनी काकींना (सरस्वतीबाईना) शिकविलं. त्यावेळचं रीळ दोनशे फुटाचं असायचं. एका रिळाला भोकं पाडायला साधारणत: साडेतीन तास लागत. आताचं रीळ एक हजार फुटाचं असतं, त्याला भोकं पाडायला किती वेळ गेला असता याची कल्पना करा. सरस्वतीबाईंचे हात भरून येत. मग मुलं थोडा वेळ मदत करीत; शिवाय आपल्या व्यापातून वेळ मिळाला की दादासाहेबही हे काम करीत.

सरस्वतीबाईंचे दुपारचं काम आटोपलं की दादासाहेब त्यांना फिल्म डेव्हलपिंगचे धडे देत. सवयीनं काकी यातही तयार झाल्या होत्या. कॅमेऱ्यात फिल्म कशी भरायची याचेही धडे दादासाहेबांनी त्यांना दिले. काकीही बुद्धिवान होत्या. थोडक्यात सर्व फाळके कुटुंब चित्रपट निर्मितीच्या कामात अहोरात्र गुंतलं होतं.

आता चित्रीकरण करून बघणं आवश्यक होतं. पण चित्रीकरण कुणाचं करायचं? मग चाळीतील मुलांची भांडाभांडी, मुलींच्या फुगड्या, झिम्मा, सागरगोट्या आदी मुलींचे खेळ याचं दादासाहेबांनी चित्रीकरण केलं. त्यावर घरच्याच रसायनशाळेत प्रक्रिया करून प्रिंटिंग केलं. दादासाहेबांनी एक जर्मन प्रोजेक्टर आणला होता. त्याच्या सहाय्यानं केलेलं चित्रण भिंतीवर पाहिलं, ते पाहून केलेलं काम समाधानकारक झाल्याचं दिसलं त्यामुळं सर्वांना आनंद झाला. आता चित्रपट सुरू करायला हरकत नाही असा विश्वास निर्माण झाला.

राजा हरिश्चंद्रचं लेखन दादासाहेबांनी पूर्ण केलच होतं. ते स्वत: उत्कृष्ट चित्रकार होतेच. त्यांनी नेपथ्य, वेशभूषेची स्केचेस काढायला सुरुवात केली. सगळं उत्साही वातावरण होतं, पण चित्रपट सुरू करायला सुरुवात करायची म्हणजे भांडवलाचं काय? ते कुठून अन् कसे उभे करायचे? हा प्रश्न होताच. चमत्काराशिवाय नमस्कार नाही हे दादासाहेब जाणून होते. त्यादृष्टीनं छोटेखानी लघुपट तयार करण्याचं त्यांनी ठरविलं. दादासाहेबांनी त्यादृष्टीनं हालचाल सुरू केली.

दादासाहेबांनी शक्कल लढविली. एका कुंडीत वाटाण्याचं बी पेरलं. त्याच्यासमोर कॅमेरा ठेवला. बी रुजून जसाजसा वेल वर येऊ लागला तसतसं त्याचं 'वनटर्नवन ब्लॉक' या पद्धतीनं चित्रीकरण सुरू केलं. म्हणजे फिल्मचा फक्त एक ब्लॉक चित्रित करायचा. वेल आणखी थोडा विस्तारला की त्याचं या पद्धतीनं चित्रण करायचं. अशा तऱ्हेने सव्वा महिना तो कॅमेरा केसाचाही धक्का लागणार नाही अशा स्थितीत ठाम ठेवला होता. प्रत्यक्ष हा लघुपट सव्वा मिनिटाचा होता. पण पडद्यावर बघताना पाहता पाहता बीजाची वाढ होत त्याचं वेलात रुपांतर होतं असं दिसतं. याचं डेव्हलपिंग, प्रिंटिंग दादासाहेब व सरस्वतीबाईनी मिळून केलं होतं. हे कसं काय झालंय हे पाहण्यासाठी उभयतांना कमालीची उत्सुकता होती. आतापर्यंत सामोरं जावं लागलेल्या दिव्याच्या कसोटीची ती परीक्षा होती. दादासाहेबांजवळ तेव्हा प्रोजेक्टर होता पण वाचून आश्चर्य वाटेल तेव्हा दादरपर्यंत वीज आलेली

नव्हती. त्यामुळं कार्बाईडच्या दिव्याच्या सहाय्यात 'रोपट्यांची वाढ' हा लघुपट घरात टांगलेल्या पडद्यावर दृगोचर होताच जमलेल्या बाळगोपाळांनी आनंदानं टाळ्या वाजविल्या. फाळके पतिपत्नींना तपश्चर्या फळास येणार म्हणून आनंदाचं भरतं आलं.

हा लघुपट दादासाहेबांना विजेवर बघायचा होता. त्यांना कळलं की काळबादेवीला सेठना नावाच्या गृहस्थाचं मोठं दुकान होतं. त्यात वीज व प्रोजेक्टर दोन्हीही आहे. दादासाहेब सेठनांना भेटले व तिथं लघुपट बघायची इच्छा व्यक्त केली. सेठनानी होकार दिला. मग अगदी निवडक मंडळींना रोपट्याची वाढ दाखविण्यात आली. दादासाहेबांना परदेशात जायला आर्थिक मदत देणारे यशवंतराव नाडकर्णीही उपस्थित होते. दादासाहेबांची किमया पाहून ते इतके भारावून गेले की ते एवढचं बोलले "दादासाहेब, वाटाण्याच्या रुपानं आज तुम्ही स्वदेशी चित्रपट व्यवसायाचं बीजारोपण केलंत." काहींनी तिथचं दादासाहेबांना कर्जाऊ रक्कम देण्याचं कबूल केलं, पण दादासाहेबांजवळ त्यांना तारण म्हणून द्यायला काहीच नव्हतं म्हणून दादासाहेबांनी पत्नीकडं दागिन्याची मागणी केली. त्यांनीही मंगळसूत्राशिवाय सर्व दागिने लगेच काढून दिले. राजा हरिश्चंद्राची कथा पडद्यावर आणताना दादासाहेबांना हरिश्चंद्रासारखं खडतर सत्व परीक्षेतून जावं लागलं, तर तारामतीची धीरोदत्तता रुपेरी पडद्यावर दाखवायला गृहलक्ष्मीला लंकेची पार्वती बनवावी लागलं होतं.

अशा तऱ्हेनं भांडवलांची सोय झाली. आता नोकरवर्ग, कलावंतांसाठी दादासाहेबांनी वर्तमानपत्रांतून जाहिराती दिल्या. सुतार, धोबी, न्हावी, पेंटर पाहिजेत तसंच ॲक्टर्स हवे आहेत. सुस्वरूप, अव्यंग, उडाणटप्पू नकोत, मुके असले तरी चालतील (तो मूकपटाचा जमाना होता) मात्र तो निर्व्यसनी असला पाहिजे. ही अट दोन्ही बाबतीत होतीच. सिनेमात काम करणाऱ्यासाठी म्हटलं होत चंगीभंगी, दिसायला वेंगरूळ नसावेत. अशांनी भेटायची तसदी घेऊ नये तरी अशाच हौशी मंडळींनी अधिक गर्दी केली, त्याचा अतोनात उपद्रव होऊ लागला. त्यामुळं दादासाहेबांनी जाहिराती बंद केल्या व त्यांनी स्वतःच कलावंत शोधायचं ठरविलं.

मुंबईतील नाट्यकला संस्थेतील एक स्त्री पार्टी नट पांडुरंग गदाधर साने व एका उर्दू नाटकात काम करणारे गजानन वासुदेव साने हे दोन साने अनुभवी नट फाळक्यांकडे दरमहा ४० रुपये पगारावर राहिले. यापैकी दुसऱ्या सान्यांच्या परिचयाचे दत्तात्रय दामोदर तथा दादा दाबके सुदृढ प्रकृतीचे व

रुबाबदार होते. त्यांना राजा हरिश्चंद्राच्या भूमिकेसाठी दादासाहेबांनी घेतलं. रोहिदासाच्या कामाला मात्र कुणी मुलगा देईना; कारण काय हरिश्चंद्र तारामतीबरोबर त्याला वनवास भोगावा लागणार, त्याला साप चावलेला दाखविणार, त्यात त्याला मृत्यू येतो हे प्रसंग आम्ही पाहूच शकणार नाही म्हणून नको असं त्यांचं म्हणणं. तेव्हा दादासाहेबांनी आपला पुत्र भालचंद्र याला रोहिदास म्हणून निश्चित केलं.

आता प्रश्न राहिला तारामतीचा. पण कुठलीही स्त्री कलाकार तारामतीला जरा तरी शोभेल अशी प्रयत्नांची शिकस्त करून मिळेना. तारामती मिळाल्याशिवाय चित्रपट सुरूही करता येईना. याबाबतीत पायपीट करून थकलेले व काहीसे निराश झालेले दादासाहेब ग्रँट रोडवरील गोखल्यांच्या उपहारगृहात चहा घ्यायला गेले असता गिऱ्हाईकांना चहा-फराळाचं आणून देणारा एक नाकीडोळी नीटस गोरागोमटा पोरगा त्यांना दिसला. त्यांना एक कल्पना सूचली. दादासाहेबांनी त्या पोराला सिनेमात काम करण्याविषयी विचारलं. तिथे त्याला जेवून खाऊन दहा रुपये मिळत होते. दादासाहेब त्याला जेवून खाऊन पंधरा रुपये द्यायला तयार झाल्यावर तो लगेच तयार झाला. फाळके फिल्म कंपनीचा सुमारे चाळीस माणसांचा ताफा दोन्ही वेळा जेवायला त्यांच्या घरी असे व एवढ्या सगळ्यांचा स्वयंपाक काकी न कंटाळता न कुरकुरता दोन्ही वेळ करीत.

दादासाहेबांनी तारामती म्हणून गोखले उपहारगृहातील तो पोऱ्या कृष्णा हरी तथा अण्णा साळुंखे याची निवड केलीच होती. पण रंगभूषेच्या वेळी प्रश्न आला. तो म्हणू लागला, "माझा बाप जिवंत आहे, मी मिशा काढणार नाही" दादासाहेबांनी त्याला पटवून देण्याचा प्रयत्न केला. 'मिशा असलेली तारामती कशी चालेल?' पण तो ऐकच ना, मग दादासाहेबांनी त्याच्या बापाची समजूत काढल्यावर कृष्णा साळुंके मिशा काढायला तयार झाला. तो भारतीय रुपेरी पडद्यावरील पहिली नायिका ठरला.

याशिवाय दादासाहेबांनी अशीच आणखी पोरं आवाज फुटून नाटकासाठी निकामी झालेली आपल्या कंपनीत भरती केली. त्यांनी स्त्रियांप्रमाणे केस वाढवायचे. त्यांची नीट निगा राखायची असा दंडक होता. स्टुडियोत आल्यावर त्यांनी लुगडी नेसायची व तांदुळ निवडणं, दळण कांडण करणं ही कामं त्यांना करावी लागत म्हणजे तशी कामं करताना ती स्त्री सुलभ दिसतील, वेंगरुळ दिसणार नाही हा हेतू.

राजा हरिश्चंद्र चित्रपटाच्या तालमी सुरू झाल्या. त्यांच्याकडून हवा तसा

अभिनय करून घेणं अत्यंत अवघड होतं. त्यांनी यापूर्वी कॅमेराचं काय पण पुष्कळांनी चित्रपट देखील पाहिला नव्हता. अभिनय म्हणजे काय? तो कसा करतात? याची त्यांना कल्पनादेखील नव्हती. दादासाहेब वारंवार अभिनय करून दाखवीत. सखाराम जाधव नावाच्या नटाला तर स्त्रियांसारखा प्रवेश करणं जमत नव्हतं. दादासाहेबांनी स्वत: लुगडं नेसून त्याला एंट्री कशी करावी असा अभिनय करताना दादासाहेबांना वेळोवेळी लुगडं नेसावं लागलं. निरनिराळ्या प्रसंगी भावदर्शन कसं असलं पाहिजे हे कळावं म्हणून इंग्रजी सिनेनियतकालिकातील वेगवेगळ्या भावदर्शक भावदर्शनाची कितीतरी छायाचित्र तालमीच्या ठिकाणी लावून ठेवली होती. प्रत्येक नटाला व्यायाम सक्तीचा होता. कंपनीकडून त्यांना दुधाचा खुराक मिळत असे.

दादासाहेबांनी विदेशी चित्रपट अभ्यास म्हणून पाहिले होते. ते बघून चित्रपटाची पटकथा कशी लिहायचीच असते? शॉटस् कसे पाडतात. याचं ज्ञान कुशाग्र बुद्धीच्या दादासाहेबांना झालं होतं. त्यानुसार चित्रपटाच्या तालमीही सुरू झाल्या. शूटिंग स्क्रीप्ट तयार झाली होती. आता पहिल्या भारतीय चित्रपटाची निर्मिती सुरू व्हायची होती.

पटकथेप्रमाणे कला दिग्दर्शन, रंगवेशभूषा, संकलन, फिल्म प्रोसेसिंग या सर्व जबाबदाऱ्या एकटे दादासाहेबच सांभाळत होते. छायालेखन (फोटोग्राफी) देखील ते करू शकत होते. पण अन्य इतक्या जबाबदाऱ्या ते सांभाळत असल्यानं एवढी जबाबदारी घेण्यासाठी दादासाहेबांनी आपले बालमित्र त्र्यंबक बाळाजी तेलंग यांना मुंबईला बोलवून घेतलं. तेलंगाच्या घराण्यात त्र्यंबकेश्वराचं सायंकाळचं पुजारीपण होतं. त्र्यंबक तेलंग स्वत: कर्मठ, सनातनी असले तरी स्थिरचित्रणाचा (स्टिल फोटोग्राफी) छंद दादासाहेबांनीच त्यांना लावला होता.

दादासाहेबांचं बोलावणं येताच त्यांच्या देशकार्यात सहभागी होण्यासाठी पूजाअर्चेची कामगिरी आपल्या बंधूवर सोपवून त्र्यंबक तेलंग मुंबईत दाखल झाले. दादासाहेबांनी आपल्या बालमित्राला योग्य मार्गदर्शन करून छायालेखनात तयार केलं. त्याच्या दोन्ही मुलीना 'राजा हरिश्चंद्र' मध्ये छोट्या छोट्या भूमिकाही दिल्या.

दादासाहेबांनी वेशभूषा, नेपथ्य, थोर चित्रकार राजा रवीवर्मा, धुरंधर यांच्या चित्रांवरून बनवून घेतल्या होत्या. त्याकाळी रेशमी, मोठ्या काठाची व पदराची लुगडी मिळत असत. त्यावर छायाचित्रणाच्या दृष्टीनं सुयोग्य अशी खडी छापून घेऊन तारामतीचे शालू बनवून घेतले होते. तारामती, हरिश्चंद्र, रोहिदास

यांच्या केसांचे टोप विकत घ्यावे लागले. राजमहाल, जंगल, पर्वत, शेत, गुहा आदी दृश्यं दादासाहेबांनी पडद्यावर स्वतःच चितारली होती.

पावसाळा संपल्यावर बंगल्याच्या आवारात दादासाहेबांच्या स्केचेसप्रमाणं सेटस् उभा करण्याचं काम सुरू झालं. रांगणेकर पेंटरांची या कामी दरमहा ६० रुपये पदावर नेमणूक झाली होती. सेटस् उभे राहितो शक्य तेवढं आऊटडोअर शूटिंग उरकायचं दादासाहेबांनी ठरविलं. पुणे-मुंबईच्या रस्त्यावर वांगणी स्टेशन आहे. सुमारे नव्वद वर्षांपूर्वी ते अगदीच छोटं खेडेगांव होतं.

राजा हरिश्चंद्राचे सैनिक चित्रीकरणासाठी रंग-वेशभूषा करून तयार झाले. त्यांच्या जवळच्या तलवारी, ढाली, भाले ते पाहून गावात चर्चा सुरू झाली. 'दरोडेखोर दिसताहेत'. पूर्वी आधी सूचना देऊन दिवसाढवळ्या दरोडे पडत असत त्यातलाच प्रकार असावा अशी भीती गावकऱ्यांना वाटली. काही घाबरलेल्या गावकऱ्यांनी पाटलाजवळ आपली शंका बोलून दाखविली. हे ऐकून पाटील हादरला व त्यानं ताबडतोब फौजदाराला वर्दी दिली.

पोलिसांच्या तुकडीसह काही वेळातच फौजदार हजर झाला व ज्या मंदिरात ही मंडळी थांबली होती तिकडं तातडीनं रवाना झाला व सैनिकांना दरवडावून विचारू लागला. एकानं त्याला विनवून सांगितलं, ''छे छे आम्ही दरोडेखोर नाही हो. आम्ही सिनेमात काम करणारे आहोत. इथं फिल्म शूटिंगसाठी आलो आहोत.'' फिल्म शूटिंग हा प्रकारच तेव्हा कुणाला माहीत नव्हता. वांगणीसारख्या खेड्यात तर ते ऐकूनसुद्धा ठाऊक असणं शक्य नव्हतं. फौजदाराला ते काही समजलं नाही त्यामुळं पटलं नाही. त्यामुळं त्यांना अटक करून पोलीस ठाण्यावर घेऊन गेला.

दादासाहेब काही निकडीची कामं उरकून नंतरच्या लोकलनं वांगणीला दाखल झाले. तेव्हा आतासारख्या पाठोपाठ लोकल्स नव्हत्या. तासाभरात एखादी लोकल यायची-जायची. दादासाहेब वांगणीला पोहोचल्यावर त्यांना झालेला प्रकार कळला. दादासाहेब लगेच फौजदाराला भेटले. सिनेमा म्हणजे काय? तो कसा तयार होतो? शूटिंग म्हणजे काय? हे समजावून सांगितलं आणि फिल्म शूटिंग दाखवायला फौजदार, पाटील यांना घेऊन गेले.

राजा हरिश्चंद्र तारामतीचा आज्ञेप्रमाणं शिरच्छेद करण्याची तलवार उगारतो या भावस्पर्शी प्रसंगाचं चित्रण होतं. इतक्यात श्रीशंकर तिथं प्रगट होऊन राजा हरिश्चंद्राचा हात धरतात वगैरे. फौज़दार, पाटील याचं समाधान व्हावं, समजूत पटावी म्हणून कॅमेऱ्यात फिल्म न भरता केवळ चित्रीकरण केल्याचं

नाटक केलं. फौजदार, पाटील प्रसंगाचं चित्रीकरण बघून भारावून गेले, दादासाहेबांच्या नव्या व्यवसायाची त्यांना कल्पना आली व त्यांनी दादासाहेबांची क्षमायाचना केली आणि सर्व सहकार्य देण्याची हमी दिली. सैनिकांची सुटका झाली. तिथून पुढं ठरविलेलं शूटिंग निर्विघ्नपणे पार पडलं. बरोबर आणलेलं स्त्रियांची भूमिका करणारे लुगडं नेसायला तयार झाले पण त्या अण्णा साळुंखे सारखेच मिशा काढायला तयार होईनात, बऱ्याच मिनतवारीनं एकदाचे तयार झाले व मिशा काढून सर्व पात्रं इतर सहकारी आणि कर्मचारी वांगणीला रवाना झाले.

इथल्या चित्रीकरणाच्या वेळी एक हृदयद्रावक प्रसंग घडला. रोहिदासाच्या भूमिकेतील भालचंद्र ऋषीकुमारांशी खेळत असताना त्याचं डोकं दगडावर जोरात आपटून त्यातून रक्तस्त्राव सुरू झाला. दादासाहेब औषधाची पेटी बरोबर बाळगत. त्यांनी प्रथमोपचार केल्यावर काही वेळानं रक्तस्त्राव कमी झाला पण भालचंद्रला मूर्छा आली.

''त्याला मुंबईला नेऊन, त्याच्यावर औषधोपचार करून तो पूर्ण बरा झाला की या दृश्याचं चित्रीकरण करू,'' असा छायालेखकानं सल्ला दिला. परंतु परत आता चित्रीकरणासाठी या दृश्याकरिता येणं म्हणजे खर्चाचा प्रश्न होता. दादासाहेबांचं म्हणणं पडलं, ''मृत रोहिदासाचा देह सरणावर ठेवायचाय ना? मग अशा बेशुद्ध अवस्थेतच त्याला ठेवू.या. तो आपोआप मृत वाटेलच.'' दादासाहेबांनी मन घट्ट करून हे दृश्य चित्रीत केलं; पण पडद्यावर दृश्य बघताना मात्र त्यांना रडू कोसळलं. प्रत्यक्ष पुत्राच्या बाबतीत आपण मन इतकं कठोर कसं करू शकलो?

दादासाहेबांचं समाधान होईतो ते शॉट ओके म्हणत नसत. छायालेखक आदीनी कितीही कौतुक केलं तरी त्यासाठी वेळ, पैसा कितीही खर्च झाला तरी ते विचार करीत नसत. झालेलं चित्रण योग्य आहे की नाही याची खात्री करून घेण्यासाठी दादासाहेब उत्सुक असत. आऊटडोअर शूटिंगच्या वेळीही फिल्म डेव्हलपिंगची व्यवस्था अगोदरच करून ठेवीत. त्याच रात्री दिवसा झालेला भाग डेव्हलप करून बघत. तो मनासारखा नाही वाटला तर दुसरे दिवशी पुन्हा चित्रण करीत.

अशा तऱ्हेनं दादासाहेब अहोरात्र आपल्या कलाकृतीत गुंतलेले असत. झोप पुरेशी मिळत नसे, रात्रीचे पुष्कळदा जेवणही होत नव्हतं. रोजचं वर्तमानपत्रही उघडून बघायला उसंत मिळत नसे. ३७०० फूटाचा म्हणजे चार रिळांचा मूकपट तयार व्हायला ६ महिने २७ दिवस लागले. तेवढ्या

अवधीत आता १३-१४ रिळांचे २ मराठी बोलपट निर्माण होऊ शकतात. दादासाहेबांच्या आग्रही वृत्तीनं 'राजा हरिश्चंद्र' चा खर्च कल्पनेबाहेर वाढला.

कितीतरी अडचणींना सामोरं जात दादासाहेब फाळक्यांनी पहिला भारतीय चित्रपट पूर्ण केला. पूर्वी नाटकाला प्रारंभी नांदी असते तशी या चित्रपटालाही नांदी घालावी अशी कल्पना दादासाहेबांना सुचली. दादासाहेबांनी त्यात सूत्रधार व्हायचं ठरविलं व काकींना नटीच्या वेशभूषेत उभं राहायला सुचविलं. काकी (सरस्वतीबाई)ना ही कल्पना पटली नाही. त्या म्हणाल्या, ''मी बाहेरून वाट्टेल तेवढी मदत करीन, अगदी हमाली करायलासुद्धा मला लाज वाटणार नाही पण तोंडाला रंग लावून पडद्यावर येणं मला आवडणार नाही.''

इतरांनीही बराच आग्रह केला. दादासाहेबांनी समजूत घालायचा प्रयत्न केला. ''माझ्या शेजारी उभं राहायला तुला काय हरकत आहे? तुझी दोन मुलं परिपार्श्वक म्हणून आपल्या जवळ उभी राहतील. कॅमेरामन आपले तेलंगच आहेत, मग काय हरकत आहे?'' तरी त्यांची समजूत पटली नाही. दादासाहेबांनीही त्यांना सक्ती केली नाही.

अखेर पांडुरंग साने नटी झाले. चित्रपट पुरा होताच दादासाहेब चित्रपट प्रदर्शनाच्या खटपटीला लागले. १९६२ सालच्या 'श्रीयुत' मे महिन्याच्या अंकात सरस्वतीबाईनी सांगितलय, चित्रपट व्यवसाय स्वदेशी व्हावा यासाठी त्यांनी सारं कुटुंब, सारा संसारच पणाला लावला होता.

☆

# राजा हरिश्चंद्र प्रदर्शित झाला

या पहिल्यावहिल्या भारतीय चित्रपटाला थिएटर मिळणं सोपं नव्हतं. चित्रपटावर अगोदरच उगीचच टीका सुरू झाली होती. 'त्र्यंबकेश्वरचे ताकभात खाणारे हे भटभाई, हे काय सिनेमा काढणार? निघाले साहेबाशी स्पर्धा करायला, यांचा चित्रपट बघण्यासारखा नसणारच, बरंच काही यांचं चुकलं असणारच, तसं दिसलं की आम्ही पडद्यावर भजी, अंडी मारणारच' ही टीका काकींच्या कानी गेली की त्या बैचेन व्हायच्या पण दादासाहेब मात्र ऐकून सोडून द्यायचे.

तसं पाहिलं तर कुणीही नवीन प्रयोग धाडसानं केला, तो स्तुत्य असला तरी प्रत्यक्ष अनुभव न घेताच त्याची टिंगल, टवाळी होतच असते. उदाहरणार्थ, व्यंगपट सृष्टीचा अजिंक्य सम्राट वॉल्ट डिस्नेचे चित्रपट प्रदर्शित व्हायला लागल्यावर 'चित्रपट सृष्टीतील धूमकेतू' अशी त्याच्यावर अमेरिकेतच टीका झालीच होती; पण चित्रपटसृष्टीच्या क्षितिजावर त्यानं ध्रुवाचं अढळपद मिळविलं.

दादासाहेबांनी काही प्रतिष्ठित मंडळींना 'राजा हरिश्चंद्र' दाखवायचं ठरविलं. २१ एप्रिल १९१३ रोजी ऑलेंपिया थिएटरमध्ये रात्रौ ९ वाजता खेळ दाखविण्याचे निश्चित झालं. नेमका त्याचवेळी दादासाहेबांच्या तान्ह्या मंदाकिनीला नवज्वर झाला होता. तिची तब्येत बिघडत चालली होती. दादासाहेबांच्या थोरल्या बंधूनी 'मुलगी एवढी आजारी आहे, तू पुढची तारीख घे' असा सल्ला दिला. दादासाहेब म्हणाले, 'माझा परमेश्वरावर पूर्ण विश्वास आहे. मी निमंत्रण पत्रिकाही पाठविल्या आहेत. याच तारखेला थिएटर मिळालय, त्यामुळं हा खेळ त्याच दिवशी दाखविला पाहिजे.'

दादासाहेबांच्यावर नवीन संकटं सतत येतच गेली, ही परंपरा पुढेही चालू राहिली. खेळ पार पडेपर्यंत दादासाहेबांनी मुलीच्या प्रकृतीची चौकशी मन विचलित होईल म्हणून केलीच नाही. भावना? की कर्तव्य? यात दादासाहेबांनी मन घट्ट करून अधिक महत्त्व दिलं कर्तव्याला. बरीच नामवंत, प्रतिष्ठित मंडळी 'राजा हरिश्चंद्र' पाहायला उपस्थित होती. वृत्त संपादक

आणि प्रतिनिधीही आवर्जून आले होते

काकी व त्यांचा पुतण्या मंदाकिनीसाठी घरीच राहणार होते. त्यावेळी काकींच्या दीरांना काय वाटलं कुणास ठाऊक, ते त्यांना म्हणाले, ''आजचा दिवस तुझ्या पतीच्या आयुष्यात सुवर्णाक्षरांनी लिहिण्यासारखा आहे. त्याच्याबरोबर तूही रात्रंदिवस कष्ट उपसले आहेत, खूप सोसलं आहेस, तुला या खेळाला गेलच पाहिजे. तू चिंता करू नकोस, आम्ही मंदाकिनीची सर्व काळजी घेऊ.'' एवढं सांगितल्यावर काकी त्या खेळाला हजर राहिल्या.

स्मॉलकॉज कोर्टाचे जज्ज मि. डोनाल्ड युरोपियन असून ते चित्रपट पाहताना रंगून गेले होते. चित्रपटाबद्दल त्यांनी प्रशंसोद्‌गार काढले. अन्य प्रतिष्ठीतानाही 'राजा हरिश्चंद्र' अतिशय आवडला होता. तसं त्यांनी भाष्यही केलं होतं. ही प्रशंसा कॉरोनेशन थिएटरचे चालक नानासाहेब चित्रे यांच्या कानी गेली. त्यानी दादासाहेबांजवळ 'राजा हरिश्चंद्र' प्रदर्शित करण्याची इच्छा प्रदर्शित केली. त्यामुळं फार महत्त्वाची समस्या सुटली.

भारतीय बनावटीचा हा चित्रपट पाहायला प्रेक्षक येतील की नाही अशी भीती वाटत होती. कारण आठवड्यात दोन विदेशी चित्रपट दाखविले जात. तितपतच ते चित्रपट चालत. तीन-चार दिवस चित्रपट चालून झालेला खर्च भरून निघणं अशक्यच होतं. फाळकेदांपत्य दत्तभक्त होतं. काकींनी चित्रपटाच्या यशासाठी पाच गुरुवार करायचं ठरविलं होतं व 'पहिल्या गल्ल्यातील ५ रु. चे पेढे वाटीन' असं श्रीदत्ताच्या तसबिरीपुढं उभं राहून भक्तीभावे नमस्कार करून म्हणाल्या होत्या. तेव्हां ५ रु. म्हणजे लहान रक्कम नव्हती.

ज्या कॉरोनेशन थिएटरमध्ये बरोबर वर्षापूर्वी दादासाहेब तोरण्यांचा पुंडलिक प्रदर्शित झाला होता. तिथच 'राजा हरिश्चंद्र' हा पहिला भारतीय चित्रपट ३ मे १९१३ रोजी प्रदर्शित झाला. प्रेक्षक येतील की नाही ही धास्ती असल्यानं प्रारंभी दोन आंग्लयुवतींचं नृत्य व दादासाहेबांनी केलेला 'आगकाड्यांची मौज' हा विनोदी लघुपटही दाखविण्यात आला.

सायंकाळी ६ पासून रात्रौ १.१५ पर्यंत पाच खेळ दाखविण्याचं जाहीर झालं. खाली विशेष सूचना होती. तिकीटाचे दर दुप्पट आहेत. भारताच्या व फाळके कुटुंबाच्या सुदैवानं थिएटरचं आवार प्रेक्षकांनी फुलून गेलं होतं. पण त्यात मराठी प्रेक्षक अभावानेच होते. आश्रय देणारे पार्शी, बोहरी यासारखे अहिंदूच होते. प्रेक्षकांची तुडुंब गर्दी बघून फाळके दांपत्याला आनंदाचं भरतं आलं. केलेल्या रात्रंदिवस कष्टाचं, सोसलेल्या सततच्या हालाचं चीज झालं

म्हणून त्यांच्या डोळ्यातून आनंदाश्रू वाहू लागले. त्यांचे सहाय्यकर्ते यशवंतराव नाडकर्णी भारावून म्हणाले ''वहिनी तुम्ही ५ रु.चे पेढे वाटणार होताना, मी शंभर रुपयांचे पेढे वाटणार आहे.''

'बाँबे क्रॉनिकल'नं प्रारंभीच म्हटल्याप्रमाणं 'राजा हरिश्चंद्र' भरगच्च गर्दीत चालला. चित्रपट १२ दिवस चालल्यावर बाँबे क्रॉनिकलच्या १५ मेच्या अंकात दुसरी जाहिरात या वृत्तपत्रात प्रसिद्ध झाली, तोवर जाहिरातीची गरजच पडली नाही. टाइम्स ऑफ इंडियाचा संपादक युरोपियन असूनही त्यानं या भारतीय पहिल्या चित्रपटाची मनसोक्त तारीफ केली होती. त्यामुळं 'राजा हरिश्चंद्र'चा बराच बोलबाला झाला आणि मग मराठी प्रेक्षक काही तरी बरं दिसतय बरं का म्हणत हळूहळू चित्रपट बघायला जाऊ लागले. बड्याबड्यांनी 'विसाव्या शतकातील मोठं आश्चर्य' असे उद्‌गार काढल्यावर टिंगलटवाळी करणारे चूप झाले.

'केसरी'चा मुंबईतील प्रतिनिधी अनंत नारायण कौलगेकर यांनी ६ मे १९१३ च्या अंकात 'राजा हरिश्चंद्र'वरील अभिप्राय देताना म्हटलं होतं, 'हा मूकपट असून बोलपटापेक्षाही अधिक परिणामकारक झाला आहे.' सर भालचंद्र भाटवडेकरांनी स्पष्टच बोलून दाखविलं होतं की, 'आमच्या सर्व वर्तमानापत्रकारांनी फाळक्यांचा रास्त गौरव करून त्यांनी जो हा हिय्या केला त्याचं योग्य चीज करावं.'

१८मेच्या अंकात शेवटचा दिवस असं जाहीर केलं होतं पण गर्दी हटत नव्हती म्हणून आणखी एक आठवडा मुक्काम वाढवावा लागला व एकूण २३ दिवस अखंड चालून 'राजा हरिश्चंद्र'नं विक्रम केला. त्यानंतर दुसरे दिवशीपासून ॲलेकझांड्रा थिएटरला तोबा गर्दीत सुरू झाला.

दादासाहेबांनी आणखी एक कमाल केली. जर्मनीचा 'स्टुडंट ऑफ प्राग' इटलीचा 'कोव्हादीस' व फ्रान्सचा 'क्वीन एलिझाबेथ' हेही त्याचवर्षीचे त्यात्या देशांचे पहिले चित्रपट, हेही त्याचवर्षी प्रदर्शित झाले. प्रतिकूल परिस्थितीवर मात करीत दादासाहेबांनी त्यांच्या अगोदर भारतीय चित्रपट प्रदर्शित केला. प्रत्येक भारतीयाला अभिमान वाटेल अशा तऱ्हेनं स्वदेशी चित्रपटाची मुहूर्तमेढ रोवली गेली. दादासाहेबांची हा चित्रपट व्यवसाय स्वदेशी करण्यामागची कठोर तपश्चर्या मूर्त स्वरूपात आली.

तेव्हां आत्तासारख्या वितरण संस्था (डिस्ट्रीब्यूटर्स) अस्तित्वात नव्हत्या त्यामुळं दादासाहेबांना शहराशहरात स्वत:चा प्रोजेक्टर, ऑपरेटर व काही मदतनीस घेऊन जावं लागे. चित्रपट निर्मितीचे सर्वेसर्वा असलेल्या या जनकाला

हेही काम त्यावेळी करावं लागलं होतं. मुंबईतील राजा हरिश्चंद्रची अफाट लोकप्रियता सर्वत्र पसरली होतीच. सुरतच्या 'नबाबी थिएटर'च्या बोहरी मालकांनी त्यांच्या चित्रपट गृहात 'राजा हरिश्चंद्र' प्रदर्शित करण्याची मनीषा व्यक्त केली. दादासाहेबांनी होकार दिला.

'नबाब थिएटर' ध्वजातोरणं, पुष्पमाळा आदींनी शृंगारले होते. कमालीची उत्सुकता होती परंतु पहिल्या खेळाला अवघे तीन रुपये उत्पन्न झालं. 'राजा हरिश्चंद्र'ची बरीच जाहिरात करून देखील ही अवस्था बघून थिएटर मालक फार निराश झाला. त्यानं दादासाहेबांना सुचविलं 'या सोळा लोकांचे पैसे परत करून खेळ रद्द करू या. तुमचा चित्रपट चांगलाच आहे याबद्दल प्रश्नच नाही, तरीपण प्रेक्षक यायला हवेत ना? तुमचा चित्रपट दीड घंटासुद्धा चालत नाही. इथं तुमच्यापेक्षा एक आण्यानं तिकीट कमी असलेलं नाटक सहा सहा तास बघायची सवय आहे. एक तर तुमच्या चित्रपटाची लांबी तरी वाढवा, नाहीतर तिकीट कमी करा.'

दोन्ही गोष्टी शक्य नव्हत्या. दादासाहेब त्याला म्हणाले, ''हे जे लोक आहेत त्यांनी चिंचोके नाही मोजले. या सोळा लोकांसाठी माझी फिल्म थोडी घासली गेली तरी हरकत नाही. हे लोक सिनेमा पाहून घरी जातील तेव्हा ते इतरांना सांगतील तेव्हा उद्या याच्या चौपट लोक येतील. ठरल्याप्रमाणं मी आठवडा पुरा करणारच.''

दादासाहेबांनी दुसरे दिवशी एक खुबीदार जाहिरात केली. एक आनामा पाउन इंच चौडू, अने बे माईल लांबू, ५७००० फोटोग्राफ जोइये (एका आण्यात पाऊण इंच रुंदीची, दोन मैल लांबीची, ५७००० फोटो असलेली फिल्म बघायला या) हे वाचून इष्ट परिणाम झाला. हे काहीतरी आश्चर्यकारक प्रकरण दिसतंय म्हणून उत्सुकतेनं चिक्कार गर्दी झाली व ३ रुपयावरून ३०० रुपयापर्यंत उत्पन्न वाढलं. आठवडाभर असच उत्पन्न होत होतं. दादासाहेबांनी अशी कल्पकतेनं जाहिरात करून चमत्कार घडविलेला बघून थिएटर मालक थक्क झाला.

'राजा हरिश्चंद्र' जिथं जिथं प्रदर्शित झाला तिथं तिथं नंतर जोरदार स्वागत झालं. पुढं तर 'राजा हरिश्चंद्र' कोलंबो व रंगून इथं चांगलाच चालला. मुंबईत धंद्याच्या दृष्टीनं बऱ्याच सोयी असल्या तरी त्याकाळी आऊटडोअर शूटिंगच्या दृष्टीनं दादासाहेबांना नाशिक सोयीचं वाटत होतं. मंदिर, नदी, घाट, लेणी, अरण्यं, वाडे आदी नाशिकजवळ, नाशिक मध्येच होते. म्हणून ३ ऑक्टोबर १९१३ रोजी 'फाळके फिल्मकंपनी'चा मुक्काम त्यांनी नाशिकला हलविला.

नाशिकला फुले मार्केट समोरील वैद्य नावाच्या गुजराथी जमिनदाराचा हौदाचा बंगला दादासाहेबांनी दरमहा ७५ रुपये भाड्यानं घेतला. आवारातच असलेल्या वनराईत तऱ्हतऱ्हेचे वृक्ष होते. तिथं बकाण लिंबू जातीचा एक प्रचंड वृक्ष होता. या वृक्षाखाली दादासाहेबांनी नैसर्गिक स्टुडिओ उभा केला होता. त्याकाळी सूर्यप्रकाश परिवर्तीत करणारे रिफ्लेक्टर्स नव्हते. ते पुढील काळात अस्तित्वात आले म्हणून दादासाहेब पांढऱ्या शुभ्र चादरीच्या सहाय्यानं हवा तसा उजेड पाडून घेत. बरेच दिवस काकी दादासाहेब सांगतील तशी चादर धरून उभ्या राहात.

दादासाहेबांचा नाशिकमधील पहिला चित्रपट 'मोहिनी भस्मासूर.' याच सुमारास चित्ताकर्ष नाटक कंपनी 'तोतयाचे बंड' व शेक्सपिअरच्या नाटकाचे प्रयोग करण्यासाठी नाशिकला आली होती. त्यांच्या कंपनीत कमलाबाई व दुर्गाबाई कामत या मायलेकी प्रमुख भूमिका करीत असत. दादासाहेबांनी त्यांचे नाट्यप्रयोग पाहिले होते.. कमलाबाईची प्रकृती नादुरुस्त झाली म्हणून त्या नाशिकला हवापालट म्हणून राहिल्या होत्या.

त्या आजारातून बऱ्या झाल्यावर दादासाहेब त्यांना भेटले व चित्रपटात काम करण्याचा विषय निघाला. त्या गम्मत व एक वेगळा अनुभव म्हणून दुर्गाबाईही 'मोहिनी भस्मासूर' मध्ये काम करायला तयार झाल्या. शिवाय दादासाहेब फाळक्यांच्या बरोबर काम करण्याची संधी होती. कमलाबाई व दुर्गाबाई दोघीही सुस्वरूप असल्यानं दादासाहेबांनी कमलाबाईना मोहिनीची व दुर्गाबाईना पार्वतीची भूमिका दिली. या भारतीय रुपेरी पडद्यावरील पहिल्या स्त्री कलाकार. तसं पाहिलं तर कमलाबाई या भारतीय चित्रपटसृष्टीच्या आद्यनायिका! चित्रपट-रंगभूमीचे ज्येष्ठ अभिनेते चंद्रकांत गोखले यांच्या त्या मातोश्री व विक्रम गोखलेच्या आजी!

२ जानेवारी १९१४ रोजी मुंबईच्या ऑलिंपिया थिएटरमध्ये 'मोहिनी भस्मासूर' प्रदर्शित झाला होता. दादासाहेबांनी तयार केलेला 'पिठाचे पंजे' हा विनोदी लघुपट याही चित्रपटाबरोबरही दाखवीत असत. या चित्रपटाचंही 'राजा हरिश्चंद्र' सारखं जोरदार स्वागत झालं त्यामुळे अर्थातच दादासाहेबांची उमेद वाढली. दादासाहेबांची सर्वत्र तारीफ होऊ लागली.

या चित्रपटात भस्मासूर शेवटी श्रीशंकराकडून मिळालेल्या वरानं स्वतःच्या डोक्यावर हात ठेवल्यावर भस्मासात होतो हा कथा भाग आहे. या दृश्याखाली दादासाहेबांनी एक शक्कल लढविली होती. आगीच्या दाहानं होरपळून निघणाऱ्या भस्मासूराचे असह्य वेदना होत असल्याचं चित्रीकरण अगोदर करून

घेतलं. कॅमेरा तसाच ठेऊन फिल्म मागं घेऊन भस्मासुराच्या जागी खराब फिल्म पेटविली. पूर्वीची फिल्मज्वालाग्रही असल्यानं ती पेटविल्यावर एकदम भडका उडत असे. त्यावरच ज्वाळांचं चित्रण केल्यानं भस्मासूर पेटल्याचा परिणाम साधता आला. अशी दादासाहेबांची कल्पकता! पाठोपाठ दादासाहेबांनी तिसरा चित्रपट हाती घेतला, तो होता 'सत्यवान सावित्री'! म्हणजे पुन्हा पौराणिकच. यात मात्र त्यांना कमलाबाई गोखले मिळाल्या नाहीत. मग अशा तशाच बाईकडून त्यांना सावित्रीची भूमिका करून घ्यावी लागली.

या चित्रपटाच्या चित्रीकरणाच्यावेळी एक प्रसंग घडला. यमराज सत्यवानाचे प्राण हरण करून नेतो असा तो प्रसंग. यमाची भूमिका एका दांडग्या पहेलवानाला दिली होती. तसाच एक दांडगा रेडाही आणला होता. यमराज रेड्यावर बसून येतो, असं ते दृश्य होतं. पण तो दांडगेश्वर त्या जंगी रेड्यावर बसायला तयार होईना. त्याला त्याची भीती वाटली. दादासाहेबांनी स्वत: रेड्यावर बसून दाखविलं तरी त्या मल्लाचा धीर होईना. शेवटी एक थोराड म्हैस आणण्यात आली. तो पहेलवान कसा बसा म्हशीवर बसायला तयार झाला. ते दृश्य एकदाचं पार पडलं पण तो रेडा नसून म्हैस आहे असं दिसू नये याची काळजी घ्यावी लागली होती.

६ जून १९१४ रोजी 'सत्यवान सावित्री' प्रदर्शित झाला. स्त्री वर्गानं फार मोठ्या प्रमाणावर या चित्रपटाला आश्रय दिला. दादासाहेबांच्या या तिसऱ्या चित्रपटानेही लौकीक आणि आर्थिक यशही पहिल्या दोन चित्रांसारखं भरघोस मिळविलं. त्यामुळं दादासाहेबांचं सारं कर्ज फिटून गेलं. या तिन्ही चित्रपटांचं उत्पन्न येतच होतं. एकेका प्रिंटवर हे एवढं उत्पन्न झालं.

दादासाहेबांची ख्याती यामुळं परदेशातही पसरली होती. त्यांच्या प्रत्येक चित्रपटाच्या २० प्रतींची मागणी होती. भारतात सोल एजन्सी घ्यायलाही लोक तयार होते. भारतातल्या सुमारे ७७० चित्रपट चालकांना त्यांचे चित्रपट दाखवायला हवे होते. चित्रपटांना मिळालेला हा प्रचंड प्रतिसाद बघून पंचवीस-तीस हजार रुपये खर्च करून विजेवर चालणारी यंत्रसामग्री घेण्याचा दादासाहेबांनी विचार केला. तोवर यंत्रसामग्री हातानं चालवावी लागे त्यामुळं सर्वकाम संथ गतीनं होत असे. चित्रपटाची गती कमीजास्त व्हायची ते वेगळच.

दोन वर्ष अहोरात्र परिश्रम करून दादासाहेबांनी अद्ययावत् नसलेल्या अपुऱ्या साधनसामग्रीवर आपल्या सहकाऱ्यांना चित्रपट तंत्राच्या विविध शाखात अमेरिका, इंग्लंडमधील तंत्रज्ञांच्या इतकं तरबेज केलं होतं.

☆

# दादासाहेबांची लंडनची दुसरी वारी

विजेवर चालणारी उपकरणं खरेदी करण्यासाठी १ ऑगस्ट १९१४ रोजी दादासाहेबांनी लंडनला प्रयाण केलं. त्यावेळी दुसऱ्या महायुद्धाचे ढग जमू लागले होते व केव्हाही महायुद्धा सुरू होण्याची शक्यता होती. म्हणून या परिस्थितीत लंडनला न जाण्याचा सल्ला काहीनी दिला होता, पण त्यांचं एकदा ठरलं की ठरलं असा त्यांचा स्वभाव होता. त्यांनी तयार केलेले तिन्ही चित्रपट घेऊन ते लंडनला गेले आणि ४ ऑगस्टला युद्धाची ठिणगी पडली.

यामुळं भारतात भलतीच घबरहाट सुरू झाली होती. पुष्कळजण आपल्या कुटुंबियांना गावी पाठवू लागले होते. पण इंग्लंडमध्ये मात्र खंबीरपणा, स्थैर्य दिसत होतं. 'बिझिनेस ॲज युजुअल' असे फलक सर्वत्र आढळत होते. अर्ध्या अर्ध्या तासानं युद्ध वार्तापत्रकं निघत होती, त्यामुळं दादासाहेब शांतपणे यंत्रसामग्री खरेदी करण्यात मग्न होते. 'बायोस्कोप' सिनेनियतकालिकाचे संपादक मि. केपबर्न यांच्याशी दादासाहेबांचा स्नेह जमलाच होता. त्यांनी दादासाहेबांचे चित्रपट लंडनमधील सिनेव्यावसायिकांना दाखविण्याची व्यवस्था केली होती.

दादासाहेबांचे चित्रपट पाहून सारेच चकित झाले. त्यांचं तांत्रिक कसब पाहून 'तांत्रिकदृष्ट्या फाळक्यांचे चित्रपट थक्क करणारे आहेत' असं 'बायोग्राफनं' म्हटलं होतं. तर 'कायनोटोग्राफ' या सिनेनियतकालिकानं तर भारावून जाऊन लिहिलं होतं 'फाळके इंग्लंडमध्येच का जन्माला आले नाहीत?' इतर वृत्तपत्रानीही दादासाहेबांच्या चित्रपटाची मनसोक्त वाखाणणी केली होती. 'भारतीय संस्कृतीचं यात यथार्थ दर्शन घडतं' हे मि. केपबर्ननी मान्य केलं होतं हे फाळक्याचं मोठं यश!

फाळक्यांनी चित्रपट निर्मितीचं शिक्षण कुणाकडही घेतलं नव्हतं. त्याचं ज्ञान त्यांनी चित्रपट स्वदेशी व्हावा या ध्यासानं आणि कुशाग्रबुद्धीन संपादन केलं होतं. लंडनमधील काही निर्मात्यांनी दादासाहेबांना इंग्लंडमध्ये

चित्रपटनिर्मिती करण्याविषयी विचारलं होतं. त्यात महत्त्वाचे ज्यांनी दादासाहेब प्रथम लंडनला गेले असता सर्वतोपरी सहकार्य दिलं होतं ते सोसिल हेपवर्थ होते. त्यांनी दादासाहेबांना इंग्लंडमध्ये भारतीय चित्रपट निर्माण करावे, कलावंत, तंत्रज्ञ भारतातून आणावे त्या सर्वांचा प्रवास, निवास खर्च, मासिक वेतन हेपवर्थ द्यायला तयार होते. शिवाय फाळक्यांना दरमहा ३०० पौंड पगार व नफ्यात २० टक्के हिस्सा अशी योजना त्यांच्यापुढं मांडली.

एवढी लाभदायक, कसलीही चिंता उरणार नाही अशी ही योजना होती. कुणालाही तो स्वीकारण्याचा मोह झाला असता, दादासाहेबांनी ती स्वीकारली असती तर ते सहकुटुंब, सहपरिवार इंग्लंडमध्ये ऐषआरामात राहिले असते. कीर्ति संपत्तीही मिळाली असती, पण सेसिल हेपवर्थना नम्र नकार देताना त्यांचे मनोमन आभार मानून दादासाहेबांनी सांगितले, 'हा व्यवसाय स्वदेशी व्हावा म्हणून मी धडपडलो. कुटुंबियाचे हाल केले. कितीतरी संकटं, अडचणी यांना तोंड द्यावं लागलं. या माध्यमाद्वारे लोकरंजनाबरोबर लोकशिक्षण व्हावं, भारतीय संस्कृती स्वकीयांप्रमाणं परकीयांनाही ज्ञात व्हावी हाच माझा ध्यास आणि हव्यास आहे. मी ही योजना स्वीकारली तर मी माझ्या ध्येयापासून तत्त्वनिष्ठेपासून ढळेन म्हणून मी ही योजना स्वीकारू शकत नाही याबद्दल क्षमा असावी.'

खऱ्या राष्ट्रभक्ताला शोभणारे हे उद्गार ऐकून हेपवर्थनी दादासाहेबांबद्दल अधिकच आदर वाटू लागला. दादासाहेबांच्या चित्रकलाकृतीची कीर्ति अमेरिकेतही पोचली होती. अमेरिकेतील सुप्रसिद्ध चित्रपटसंस्था वॉर्नर ब्रदर्सने त्यांच्या चित्रपटांच्या काही प्रती विकत घेण्याची इच्छा प्रकट केली होती. दादासाहेबांनी संमतीही कळविली होती. पण भारतातील परिस्थितीच्या बातम्या, स्टुडियोची होत चाललेली चिंताजनक परिस्थिती या सर्वांचा विचार करून प्रतींबाबत कोणताही व्यवहार पूर्ण न करता त्यांना घाईनं भारतात परत यावं लागलं होतं. दुर्दैव!

विजेवर चालणाऱ्या यंत्रसामग्रीची खरेदी फक्त झाली होती, प्रतींचा व्यवहार झाला असता तर केवढंतरी भांडवल दादासाहेबांच्या हाती आलं असतं, पण रिक्त- हस्तानं दादासाहेबांना भारतात परतावं लागलं होतं. त्या दृष्टीनं दादासाहेबांची ही वारी अयशस्वी ठरली. १९१४च्या अखेरीस ते स्वदेशी परतले.

भारतात गेल्यावर पुढं काय काय वाढून ठेवलं असेल याची चिंता दादासाहेबांना सारखी लागून राहिली होती. पण त्यांना वाटत होतं त्यापेक्षाही

दारुण अवस्था होती. भांडवलदारांनी पैसे द्यायचं थांबविलं होतच पण सर्व कर्मचाऱ्यांना काढून टाकून स्टुडियोला कुलूप लावायला सांगितलं होतं. सरस्वतीबाईनी दादासाहेब परत येईतो कर्मचाऱ्यांना काढून न टाकण्याचं व स्टुडियोला टाळा न ठोकण्याचं सावकारांना विनवणी करून थांबविलं होतं, पण आणखी भांडवल द्यायला तो अजिबात तयार नव्हता. युद्धामुळं भारतात निर्माण झालेल्या अनिश्चित वातावरणामुळं कुणीही धनिक कर्ज द्यायला तयार होईना, उलट जे भांडवलदार त्यांना आर्थिक सहाय्य द्यायला तयार होते त्यांनी आपले पैसे अन्य व्यवसायात गुंतविले.

अगोदरच दादासाहेबांच्यावर कर्जाचा बोजा होताच, अशा स्थितीत स्टुडियोत कुलूप लागलं असतं तर दादासाहेबांना नादारी घ्यावी लागली असती आणि मग स्वदेशी चित्रपट व्यवसायाचा अपमृत्यू अटळ होता. तसं झालं असतं तर लंडन, अमेरिकेत भारताची बेअब्रू झाली असती ही खंत दादासाहेबांना लागून राहिली असती. कसंही करून हा व्यवसाय जिवंत ठेवण्याचा दादासाहेबांनी चंग बांधला.

प्रारंभीच्या काळात दादासाहेबांना मदत केलेले यशवंतराव नाडकर्णी व त्यांचे सॉलिसिटर श्वशूर चिटणीस यांना दादासाहेबांनी विनविले की, 'इंग्लंडमध्ये खरेदी करून ठेवलेली यंत्रसामग्री गंजून जाऊ नये म्हणून ती भारतात आणण्यासाठी कर्जाऊ रक्कम त्वरीत द्यावी व स्टुडियोचा खर्च भागेल इतक्या खर्चाची तरतूद करावी वर्षभरात चित्रपट निर्मिती करून कर्जफेड करता येईल.'' इंग्लंडमधील निर्मात्यानी दादासाहेबांना दिलेल्या ऑफर्स, तिथल्या प्रतिक्रिया, प्रिंटस्ना आलेल्या मागण्या वगैरे वृत्तांत दादासाहेबांनी त्यांना सांगितला.

काही दिवसांपुरता अर्धा खर्च देण्याचं त्यांनी मान्य केलं. दादासाहेबांच्या काही निष्ठावंत कर्मचाऱ्यांनी अर्ध्या पगारावर काम करण्याची तयारी दर्शविली त्यामुळं काहीतरी काम सुरू करणं शक्य झालं. पण एक संकट सरलं की दुसरं उभं राहतच होतं. युद्धकाळ असल्यानं कच्ची फिल्म (निगेटिव्ह) मिळणंही अवघड होऊन बसलं.

हा सगळा विचार करून दादासाहेबांनी लघुपट काढायचं ठरविलं. त्यानुसार 'कार्तिकी पौर्णिमेचा उत्सव', 'गोदावरी नदीचं दर्शन', 'तळेगावचा काच कारखाना', 'प्रो. केल्फांच्या जादू' हे लघुपट तयार केले म्हणजे माहितीपटांचे जनकही दादासाहेबच होते. यात भारतीय प्राचीन वैभव व संस्कृतीचं दर्शन त्यांनी घडविलं होतं.

पण भांडवलदारांनी शब्द फिरविला, इतर भांडवलदार नाना शंका विचारीत. 'धंदा बसत चालला तर लोक सिनेमाला येणार नाहीत; मग आमचे पैसे कसे वसूल होणार? तुम्ही अचानक मरण पावलात तर? नंतर तसे चित्रपट निघालेच नाहीत तर? दादासाहेबांचे लाखभर रुपये स्टुडियोत अडकले होते, पण स्टुडियोचा त्यांचा वापर करता येईना. जुन्या चित्रपटांना उत्पन्न होईना. कर्मचाऱ्यांना देशोधडीही लावता येईना, त्यांना काढून टाकलं तर भांडवल मिळण्याची शक्यताच नव्हती. दादासाहेबांच्या कर्मचाऱ्यांपैकी पुष्कळांना मलेरियानं पछाडलं, व्यवस्थापकांवर गंभीर शस्त्रक्रिया करावी लागली. छायालेखक आजारी पडला. त्याची प्रकृती चिंताजनक झाली होती. इलेक्ट्रिशिअन कॉलऱ्यानं मरण पावला. एकटे दादासाहेब कुठं कुठं पुरे पडणार? त्यात आर्थिक चिंताही जोडीला होतीच. परमेश्वर त्यांची कसोटीच बघत होता. दादासाहेब खंबीर म्हणूनच अशा स्थितीतही ते ठामपणे टिकले. त्यांना स्वदेशी व्यवसाय जिवंत ठेवायचा होता.

'माझे प्राण पणाला लावीन पण जिवात जीव आहे तोवर हा स्वदेशी व्यवसाय बंद पडू देणार नाही' अशी दादासाहेबांनी प्रतिज्ञा केली पण तारणाशिवाय कुणी भांडवल द्यायला तयार नव्हतं. शेवटी दादासाहेबांनी स्टुडियोवर कर्ज काढलं आणि 'राजा श्रियाळ' या चित्रपटाच्या तयारीला लागले. चित्रीकरणाला प्रारंभही झाला पण संकटं कधी एकटी येत नसतात. राजा श्रियाळची भूमिका करणारा नट १०३ डिग्री तापानं फणफणला तरी तसचं काम चालू ठेवलं. चारपाच प्रसंग कसेबसे पार पडले आणि त्याचं दुखणं उलटलं आणि त्याच्या आजारानं उग्र स्वरूप धारण केलं. तो कधी बरा होईल हे सांगता येईना. जिन्यावरून एका दृश्यात उतरताना नायिकेचा पाय इतका मुरगळला की तिला उभं राहणं अशक्य झालं. या सर्व दगदगीचा दादासाहेबांना इतका त्रास झाला की त्यांनाच सपाटून ताप भरला. त्यातच मायग्रेनचा त्रास सुरू झाला.

चित्रपट जेवढा लांबे तेवढा कर्जाचा बोजा वाढणार होता. नायक नायिका लवकर बरे होण्याची शक्यता दिसेना. मग राजा श्रियाळची भूमिका स्वतः करायचं दादासाहेबांनी ठरविलं. चिलया त्यांचा पुत्र भालचंद्र करणार होता. ही सर्व अडचणीची परिस्थिती लक्षात घेऊन 'मी हमाली करीन परंतु तोंडाला रंग लावणार नाही' असं म्हणालेल्या काकी (सरस्वतीबाई) चांगुणाची भूमिका करायला तयार झाल्या, फक्त एक अट होती की त्याचं नाव कुठही द्यायचं नाही, इतकं सगळं होऊनही राजा श्रियाळ अपूर्णच राहिला.

प्रकृती पूर्ण बरी झाल्यावर दादासाहेबांचे भांडवल उभारण्याचे प्रयत्न सुरू झाले. एक मंगळसूत्राखेरीज सर्व दागिने विकलेच होते. दादासाहेब स्वदेशी चळवळीच्या नेत्यांना पुन्हा एकदा भेटले पण काहीही उपयोग झाला नाही. श्रीमंतांचे उंबरठे झिजविले पण व्यर्थ. मग अच्युत बळवंत कोल्हटकर यांच्या 'संदेश' या वृत्तपत्रातून एक रुपयापासून मदतीचं आवाहन केलं व ते सव्याज परतफेड करण्याचं आश्वासन दिलं फक्त तिघेजण मदत करायला तयार झाले. ११ टक्के व्याज देण्याची तयारी दाखवूनही दादासाहेबांना कुणी कर्ज द्यायला तयार होईना.

लोकमान्य टिळक एकदा दादासाहेबांच्या स्टुडियोत आले होते. दादासाहेबांनी आपली स्वदेशी चित्रपटासाठी करीत असलेली धडपड व एकूण करुण कहाणी त्यांच्या कानावर घातली. ते ऐकून लोकमान्यांचं मन द्रवलं. चित्रपट हे जनजागृतीचं सर्वात प्रभावी माध्यम आहे हे त्यांच्यासारखा द्रष्टा महापुरुष जाणून होता म्हणून पैसा फंड संस्थेतून कर्जाची सोय करण्याचा लोकमान्यानी प्रयत्न केला. पण त्यांनाही यश आलं नाही.

मग दादासाहेबांनी पुन्हा एकदा जनतेला आवाहन केलं, 'ही संस्था मरू देऊ नका' आर्थिक आवक थांबलेली, देणं वाढत चाललेलं. दादासाहेब चक्रवाढ व्याजानं तिमाही हप्ते देत होते, नोकरांचे पगार होत नव्हते, तरी प्रामाणिक नोकरवर्ग रोज स्टुडियोत येत होता. त्यामुळं दादासाहेबांचा ऊर भरून येत होता. याशिवाय काही खऱ्या हितचिंतकांचा व पत्नीचा फार मोठा नैतिक आधार यामुळंच दादासाहेब निराश होऊन हतबल न होता हिमतीनं उभे होते.

भांडवल उभं करण्यासाठी १९१६ साली दादासाहेबांनी आणखी एक प्रयत्न केला. 'राजा हरिश्चंद्र' 'मोहिनी भस्मासूर' व 'सत्यवान सावित्री' हे त्यांचे चित्रपट मोठ्या शहरी दाखवून अर्थप्राप्ती करण्याच्या इराद्यानं भ्रमंतीसाठी बाहेर पडले. जमखिंडी, औंध, मिरज संस्थानिकांना दादासाहेबांनी चित्रपट दाखविले. फक्त औंधकरांनी एक हजार रुपये दिले. बाकी दोन्ही ठिकाणी फक्त कौतुक झालं.

मग दादासाहेब ग्वाल्हेर, इंदौरकडं गेले. थिएटर्स नसल्यानं सर्व सामग्री बरोबर घेऊन जावे लागे. ग्वाल्हेरला दोन महिने मुक्काम होता. पण तिथं त्यांना आर्थिक लाभ काहीही झाला नाही. तितकाच मुक्काम इंदौरला होता. तिथल्या राजकन्येनं मात्र ५ हजार रुपये कर्ज व १५०० रुपये बिदागी म्हणून दिले.

दादासाहेब या दौऱ्यावर असताना त्यांनी किर्लोस्करवाडीला भेट दिली होती. तिथंही हे चित्रपट दाखविले. ते संपल्यावर एका कामगारानं दादासाहेबांचे पाय धरले. दादासाहेबांनी विचारलं, 'अरे, हे काय करतोस तू?' तो म्हणाला, 'तुम्ही आम्हाला चित्रांच्या हालचाली दाखविल्यात ना म्हणून.' दादासाहेब गहिवरले.

स्टेशनवर एक विनोद घडला. तिथं एक खेळणीवाला खेळणी विकताना ओरडत होता. 'फाळके चार आणे, फाळके चार आणे' फाळके गंमतीनं म्हणाले, 'माझी चांगली किमंत केली की यानं.' यावर लक्ष्मणराव किर्लोस्कर म्हणाले, 'अहो, ती हालचाल करणारी खेळणी आहेत ना याची, तुम्हीही चित्रांच्या अशाच हालचाली दाखविता ना म्हणून तो तसं ओरडतोय. बघा, तुमची कीर्ति त्याच्यापर्यंत पोचली आहे असा याचा अर्थ,' दोघंही हसले.

चित्रपट निर्मितीसाठी भांडवलदारांकडून अडवणूक व्हायला लागली. खेळत्या भांडवलासाठी ३ वर्ष सतत धडपड करूनही दादासाहेबांना काहीच यश आलं नाही, तेव्हा दादासाहेबांनी अनावृत्त पत्र लिहून देशबांधवांकडे धाव घेतली. पत्र बरंच मोठं आहे. स्वदेशी व्यवसाय वाचविण्यासाठी त्यांची तळमळ वाचून वाचकाच्या डोळ्यात पाणी उभं राहतं असे.

☆

# 'लंकादहन'नं केलेली क्रांती

दादासाहेबांच्या या कळकळीच्या आवाहनाला काहीच प्रतिसाद मिळाला नाही. फक्त तिघेजण आर्थिक सहाय्य करायला तयार झाले ते मध्यम व सामान्य परिस्थि:तीतील होते हे विशेष. यातही एक चटका लावणारा प्रसंग घडला. नाशिक इथलेच एक गरीबीतील दांपत्य दादासाहेबांकडं आलं. त्यांनी आदरानं नमस्कार केला. त्या सुवासिनीनं तिच्याकडं मंगलसूत्राखेरीज अलंकार म्हणून असलेला पाटल्यांचा जोड दादासाहेबांच्या चरणावर ठेवला.

त्यांची परिस्थिती त्यांना पाहाताक्षणी लक्षात येत होती म्हणून दादासाहेबांनी ते घेण्यास नकार दिला, तेव्हा त्यांनी दादासाहेबांना विनंती केली- 'आमच्याकडं आपल्या देशकार्याला देण्यासारखं एवढंच आहे. आणखी असतं तर तेही आनंदानं दिलं असतं.' तरीही दादासाहेबांना त्या पाटल्या घेवेनात. ती सुवासिनी म्हणाली 'आपण हे घेत नसला तर मी आत्ताच्या आता सराफ कट्ट्यावर जाऊन हे विकेन व त्याचा द्रव्य आपल्या पायावर ओतेन. आतापर्यंत वेळ प्रसंगी उपयोगी पडतील म्हणून मी या पाटल्या वाचविल्या. त्याचं सार्थक होण्याची वेळ आली आहे. आपण माझ्या संकल्पाच्या आड येऊ नये. आपल्या या महान राष्ट्र कार्याला आम्हा गरीबांचा एवढा तरी हातभार लागू दे.' दादासाहेबांनी त्या गृहस्वामिनीनं एवढी विनंती केल्यावर भरल्या डोळ्यांनी त्या पुण्यशील सुवासिनीच्या पाटल्या स्वीकारल्यावर ते दांपत्य आनंदानं गेलं.

१७ व १८ मे १९१७ रोजी नाशिकला मुंबई प्रांतिक काँग्रेस परिषदेचं अधिवेशन भरलं होतं, त्याला लोकमान्य टिळक उपस्थित होते. त्यांनी दादासाहेबांच्या स्टुडिओला भेट दिली. त्याचा वृत्तांत 'संदेश'च्या २० मेच्या अग्रलेखात वरील प्रसंगाच्या शीर्षकाखाली प्रसिद्ध झाला होता 'बायकोचे दागिने', त्यात म्हटलं होतं पानसुपारी सत्कार समारंभ झाल्यावर दादासाहेब तिथं जमलेल्या दोनतीनशे प्रतिनिधींना उद्देशून बोलले. त्यांचा कंठ इतका दाटून आला होता की त्यांच्या तोंडून शब्द फुटेना. डोळे अश्रूंनी डबडबले होते. लोकमान्यांसह सगळे हेलावले. दादासाहेबांच्या लोकमान्यांना उद्देशून

उच्चारलेल्या 'महाराज, हे अंत:करण नुसते जळते आहे' याचा विलक्षण परिणाम झाला.

बऱ्याच जणांनी तिथल्या तिथं पंधरा, वीस, पंचवीस, शंभरपर्यंत रोख रक्कम दिली. ज्यांच्याजवळ तेव्हा पैसे नव्हते त्यांनी कँपवर कोणास तरी पाठवायची विनंती केली. अमरावती येथील एका अगदी सामान्य परिस्थितीतल्या गृहस्थानं प्रतिज्ञा केली- दादासाहेबांना दरमहा एक रुपया पाठवीत जाईन.

दादासाहेबांच्या या उदात्त हेतूसाठी चाललेली धडपड बघून दोन महिलांना त्यांची करुणा आली व त्यांनी दादासाहेबांच्या या सत्कार्यासाठी उसनवार रक्कम आणून त्यांच्या स्वाधीन केली. एकदोन स्नेह्यांकडून त्यात थोडीशी भर पडली. मे महिन्यातील काँग्रेसच्या अधिवेशनाच्यावेळी लोकमान्य टिळकांनी केलेल्या आवाहनाचा योग्य परिणाम दिसू लागला. हे पाहून दादासाहेबांनी चित्रपट निर्मितीची तयारी चालविली. रामायणातील 'लंकादहन' हा रोमहर्षक भाग चित्रपटासाठी निवडला. चित्रपटाचं नावही 'लंकादहन' ठरलं.

'लंकादहन'चं बरचसं चित्रीकरण त्र्यंबकेश्वरी झालं. पहाटे चार वाजता आठ बैलगाड्या, तंत्रज्ञ, कलावंत, इतर कर्मचारी आणि आवश्यक ते साहित्य घेऊन तयार असत. दादासाहेबांच्या खाक्याच तसा होता. ते स्वत: वेळेपूर्वी हजर असत. सर्वांचं भोजन दादासाहेबांच्या घरून येई. दादासाहेब सर्वांच्यात मिळून मिसळून भोजन करीत. त्यावेळी ते सर्वांशी मोकळेपणानं आणि प्रेमानं वागत. मात्र कामाच्यावेळी फार कडक असत.

मारुतीचं उड्डाण हे यातील दृश्य अचंबित करणारं होतं. दादासाहेबांची कन्या भारतीय पडद्यावरील पहिली बालकलाकार मंदाकिनी तथा माई आठवले यांनी मला सांगितलं होतं की, 'स्टुडिओतील बकाणा वृक्षाखाली आठदहा फूट उंचीचा एक लोखंडी गर्डर होता. त्यावर दादांनी तीन मारुतीना पालथं पडायला सांगितलं व त्यांनी हातापायाची हलचाल सुरू केली की चित्रणाला सुरूवात होत असे. मारुती उंचउंच व दूरदूर उड्डाण करीत चालला आहे असा भास व्हायचा दूर गेल्यावर मारुतीचा आकार सहाजिकच लहान होत जातो. सर्वात छोटा दिसणारा मारुती मी होते. गर्डरच्या मागं काळा मोठा पडदा लावला होता त्यामुळं पडद्यावर फक्त मारुतीचं दिसायचा.

कुठल्याही चित्रपटात मारुती नाकासमोर जाताना दिसतो, पण या चित्रपटातील मारुती मात्र आकाशात गरागरा आणि उलटासुलटा फिरताना दिसायचा. ते बघून प्रेक्षक आश्चर्य चकित होऊन टाळ्यांचा कडकडाट करीत. 'राक्षसांची फलटण' हाही असाच पुन्हा पुन्हा पहावा असा प्रसंग होता.

यात रावणाला पापाचे घडे भरले याची जाणीव देण्यासाठी शंभर राक्षसांची फलटण दाखविली होती. एका आक्राळविक्राळ अवाढव्य राक्षसाच्या हातून रावणाच्या पापाचा एक एक दैत्य बाहेर पडतो असे दाखविले होते. एकेक राक्षस म्हणजे पापाचे एकेक रूपक दाखविले होते. अशा तऱ्हेची बरीच (Trick Photography) 'लंकादहन'मध्ये बघायला मिळत होती. चित्रचमत्कृती हे या चित्रपटाचं जबरदस्त आकर्षण होतं.

'लंकादहन' प्रथम पुण्याच्या आर्यन सिनेमात १७ सप्टेंबर १९१७ रोजी प्रदर्शित झाला होता. पहिल्या दिवसापासूनच दणकून गर्दी होऊ लागली. दि. १९ सप्टेंबरला आर्यन सिनेमातर्फे ४ वाजताच्या खेळाच्यावेळी दादासाहेब फाळक्यांनी जे देश कार्य अंगिकारलं होतं त्याबद्दल त्यांचा नामदार रॅंग्लर र. पु. परांजपे यांच्या हस्ते हिरेजडित सुवर्णपदक देऊन सत्कार करण्यात आला होता.

'लंकादहन' मुंबईत वेस्टएंड सिनेमात (आत्ताचं नाझ) प्रदर्शित झाला मात्र आणि गर्दीला सुमार राहिला नाही. त्यामुळं सकाळी ७ वाजल्यापासून मध्यरात्री ३ पर्यंत 'लंकादहन'चे खेळ दाखविले जाऊ लागले. विशेष म्हणजे यातला प्रत्येक खेळ हाऊसफुल जात होता. मुंबईच्या वेस्टएंड सिनेमातल्या काळात १० दिवसात ३२ हजार रुपये उत्पन्न झालं. पुण्याच्या आर्यन सिनेमात अनावर गर्दीनं दरवाजे तोडले. मद्रासमध्ये (चेन्नई) तर गल्ला एवढ्या प्रचंड प्रमाणात जमा होत होता की, बैलगाडीत पोत्यात भरून पोलीस पहाऱ्यात न्यावा लागे. असं अद्भूत दृश्य भारतात प्रथमच दिसत होतं.

ज्या ज्या शहरी 'लंकादहन' दाखविला गेला त्या शहराच्या आजूबाजूच्या उपनगरातून, खेड्यातून चित्रपट बघायला येणाऱ्या रहिवाशांच्या बैलगाड्यांची एवढी रांग लागायची की वाहतूक बंद व्हायची. पुष्कळसे प्रेक्षक तर हा चित्रपट बघण्यासाठी शहरातच जमेल तिथं मुक्काम करीत. अशांची संख्याही फार मोठी होती. केवळ चित्रपट परिक्षणानं नव्हे तर चित्रपट पाहून मंत्रमुग्ध झालेल्या प्रेक्षकांकडून या चित्रपटाची थोरवी ऐकून अन्य प्रेक्षक गर्दी करू लागले.

दादासाहेबांनी एका लेखात म्हटलं आहे 'ऐन लढाईच्या हंगामात लंकादहन करून व्यापारी दृष्टीनं 'शंकादहन' केलं आहे, सिनेमा थिएटरास देशी चित्रपटांसंबंधानं पुन्हा आशा वाटू लागली आहे. माझ्या जुना, नव्या व पुढं होणाऱ्या चित्रपटांची आगाऊ कॉन्ट्रक्टस् होऊ लागली आहेत. मुंबई, कलकत्ता, मद्रास, कराची वगैरे मोठ्या शहरांतून त्याचप्रमाणं लहानलहान

गावातूनही माझे चित्रपट दाखविले जाऊ लागले आहेत. तीन वर्ष विलायतेशी बंद असलेला पत्रव्यवहार पुन्हा सुरू झाला आहे. सारांश लाखो रुपयांची उलाढाल करणारा धंदा आता सर्व शंका-कुशंकांचे निरसन करून मूर्त स्वरुपात हिंदीवासियांपुढं छातीठोकपणे उभा आहे.'

'लंकादहन' पूर्वीच्या फाळके फिल्म कंपनीला किती संकटं, अडचणी, उपहास, उपेक्षा अपमान सोसणं भाग पडलं याची वाचकांना कल्पना आलीच आहे तरीही दादासाहेबांना हिंमतीनं संस्था बंद पडू दिली नव्हती अर्थात त्यांच्या इमानी सहकाऱ्यांच्या निष्ठेवर, जिद्दीवर व परिश्रमावर चित्रपट तयार होत होते पण त्या चित्रपटातून येणारा पैसा संस्थेचा खर्च चालविण्यास अपुरा पडत होता तरी निर्मितीत दादासाहेबांनी कधीच काटकसर केली नाही की खर्चाचा वेळेचा विचार केला नाही.

'लंकादहन'ला लाभलेल्या डोळे दिपविणाऱ्या यशानं चित्रपटाचा व्यवसाय भरपूर पैसा मिळवून देणारा व्यवसाय आहे असं काही व्यापारीवृत्तीच्या मंडळींना वाटू लागलं, तोवर आर्थिक सहाय्यासाठी वणवण फिरणाऱ्या दादासाहेबांच्या दारी भांडवलदार पैशाच्या थैल्या घेऊन धिरट्या घालू लागले. लक्ष्मी त्यांच्याकडं चालून येऊ लागली. त्यांच्याबरोबर भागीदारी स्वीकारण्याची तयारी दर्शविली.

भारतीय चित्रपट बघण्याची गोडी लावण्याचे फार मोठं कार्य 'लंकादहन'नं केलं. या अगोदरचे चित्रपट प्रेक्षक कुतुहल, कौतुक म्हणून बघत होते. या चित्रपटापासून स्वदेशी चित्रपटांविषयी प्रेक्षकांना आकर्षण निर्माण झालं, त्यांच्या अपेक्षा वाढविल्या, ही 'लंकादहन'नं केलेली किमया आहे.

१९१७ साल हे भारतीय चित्रपटसृष्टीच्या इतिहासात सर्वात महत्त्वाचं वर्ष आहे. याच वर्षी कलकत्त्याच्या जे. एफ. मादन यांच्या संस्थेचा 'नलदमयंती' हा पूर्ण लांबीचा पहिला चित्रपट प्रदर्शित झाला. यात इटालिअन कलावंतांनी कामं केली होती. मनेली पतिपत्नी प्रमुख भूमिकात होते.

याच वर्षी दक्षिणेतही चित्रपट व्यवसायाचा पाया घातला गेला. आर. व्यंकटया, आर. नटराज मुदलियार हे त्यातले प्रमुख होते. पैकी नटराज मुदलियार यांनी मद्रासमध्ये (चेन्नई) १९१७ सालीच इंडियन फिल्म कंपनीची, स्थापना केली. ही स्फूर्ती प्रवर्तकांना लंहादहन पासून मिळाली.

विदेशी व फाळक्यांचे चित्रपट बघून कलामहर्षी बाबूराव पेंटर व त्यांचे मामेबंधू थोर चित्रकार आनंदराव पेंटर यांनीही चित्रपट निर्मितीचा ध्यास घेतला. त्यांनी स्वत:च कॅमेरा तयार केला. या कामी त्यांना हरहुन्नरी शिष्य, निपुण चित्रकार, यंत्रज्ञ विष्णुपंत दामले व दादा मिस्त्री यांचं मोलाचं सहाय्य झालं.

ही घटनाही १९१७ सालातीलच.

प्रत्येक कामकाजाला प्रारंभ होण्याच्या थोडेच दिवस आधी आनंदराव पेंटरांचं अकाली निधन झालं तरीही याचवर्षा अखेर बाबूराव पेंटरांनी महाराष्ट्र फिल्म कंपनीची स्थापना केली तोवर पाचसहा वर्षं दादासाहेब फाळके 'एकला चलोरे' या उक्तीप्रमाणं एकांडे शिलेदार सर्वस्वपणाला लावून स्वदेशी चित्रपट निर्मितीसाठी एकटेच झटत, धडपडत होते.

☆

# हिंदुस्थान सिनेमा कंपनीची स्थापना

दादासाहेबांच्या निष्ठावंत सहकाऱ्यांनी दादासाहेबांना विनंती केली की कालपर्यंत तुम्ही अनेकांचे पैशासाठी उंबरठे झिजविलेत, त्यावेळी तुम्हाला कुणीही दारात उभं केलं नाही, ठिकठिकाणी अपमान सोसलेत, कितीतरी कटू अनुभव घेतलेत, आज डबोलं घेऊन तुम्हाला विनविण्या करायला येतात ते स्वदेशी व्यवसायावरील प्रेमामुळं नव्हे, त्यांना दिसू लागलेल्या लाभामुळं. ताकावरील आयतं लोणी खाण्याच्या उद्देशानं.

सहकाऱ्यांच्या भावना दादासाहेब समजू शकत होते, परंतु भांडवलाचा प्रश्न त्यामुळं सुटणार नव्हता, तो तसाच राहिला असता. 'लंकादहन'ला जो अलोट पैसा मिळाला तो सगळा कर्ज फेडीत खर्ची पडला एवढं कर्ज झालं होतं. एवढंच झालं की दादासाहेब 'लंकादहन'मुळं एकदाचे कर्जमुक्त झाले होते व रात्रंदिवस घोर लावणारी विवंचना तात्पुरती तरी दूर झाली होती. पुढच्या चित्रपटाला आता भांडवल कुठून उभं करायचं हा यक्षप्रश्न शिल्लक राहिलाच होता. त्यामुळं दादासाहेबांनी आपल्या सहकाऱ्यांची समजूत काढली. पाच धनिक भागीदारांसह १ जानेवारी १९१८ रोजी हिंदुस्थान सिनेमा फिल्म कंपनीची स्थापना केली.

हा व्यवसाय स्वदेशी करण्याच्या दादासाहेबांच्या मनानं घेतलं होतं तेव्हांपासून श्रीकृष्णावर चित्रपट काढण्याचं त्यांच्या मनात होतं तो योग आता आला होता व 'श्रीकृष्ण जन्म' असा चित्रपट घेण्याचं सर्वानुमते ठरलं. कृष्णाच्या बालरुपांसाठी दादासाहेबांनी वयाप्रमाणं आपल्या लेकरांना म्हणजे बाबाराय, महादेव, व मंदाकिनी यांना भूमिका दिल्या.

या चित्रपटात श्रीकृष्णाच्या बारशाचा सोहळा आहे. नेहमी स्त्रियांची कामं करणारे पाचच नट होते पण बारशासारखा प्रसंग तोही नंद-यशोदाकडील, मग पाचच स्त्रिया असून कसं चालेल? स्टुडिओतील कामगारांशिवाय जे कुणी हौशी असतील त्यांना लुगडी नेसून बसविलं. दादासाहेबांच्या घरचा आचारी, स्टुडिओचा रखवालदार देखील होते. फक्त त्यांचे चेहरे दिसणार

नाहीत हे पाहिलं. त्यामुळेच बारशाला पुरेशा बायका दिसू शकल्या. अशाही युक्त्या त्या वेळी कराव्या लागत.

या चित्रपटात कमळाच्या फुलाचा शॉट हवा होता, पण तो हंगाम कमळाच्या फुलांचा नव्हता, प्रयत्न करूनही कमळाचं फूल कुठं मिळालं नाही म्हणून दादासाहेब अडून बसले नाहीत. त्यांनी एक कांदा घेतला व तो असा खुबीनं कापला की पडद्यावर कमळाचं फूल बघत आहोत असं वाटायचं.

चित्रचमत्कृतीत (ट्रिक फोटोग्राफी) तर दादासाहेब तरबेज होते. या चित्रपटात तुरूंगाच्या कडेकोट बंदोबस्ततही कृष्ण गोकुळात सुखरूप पोचला हे वृत्त कळताच भयभीत पण संतापलेल्या कंसाला दशदिशांना कृष्णच कृष्ण दिसतो. संतापानं कंस गदा उचलतो तेव्हा कृष्ण तलवार, भाला, चक्र, धनुष्यबाण आदी आयुधांनी चाल करून येतो असा कंसाला भास होतो. त्यावेळी प्रिझम लेन्स किंवा ऑप्टिकल प्रिंटर हे शब्दसुद्धा अस्तित्वात नव्हते. या दृश्यासाठी एकाच फिल्मवर दहा निरनिराळ्या कोनातून दादासाहेबांनी कृष्णाचे शॉटस् घेतले व हवा तो परिणाम साधला. हे दृश्य बघून प्रेक्षक थक्क होत तोवर परदेशातही असा प्रयोग कुणी केला नव्हता हे विशेष.

'श्रीकृष्णजन्म' २४ ऑगस्ट १९१८ रोजी मुंबईच्या मॅजेस्टिक सिनेमात प्रदर्शित झाला. ६ रिळांच्या या चित्रपटाला चांगलाच प्रतिसाद मिळाला. त्या काळात या चित्रपटानं ३ लाख रुपयांचा धंदा केला होता. या चित्रपटाच्या वेळी आणखी एक गोष्ट झाली. मुंबई व मद्रास इथं वितरणासाठी (डिस्ट्रिब्यूशन) स्वतंत्र कार्यालये स्थापन करण्यात आली. या चित्रपटासह विविध विषयावरील अनुबोधपट धरून दादासाहेबांचे ४६ चित्रपट झाले होते.

☆

# 'कालिया मर्दन'नं कमाल केली

हिंदुस्थान सिनेमा फिल्म कंपनीला 'श्रीकृष्ण जन्म' हा पहिलाचा चित्रपट यशवंत ठरला. पुढला चित्रपट होता 'कालिया मर्दन'. तो विषय कसा सुचला तो किस्सा असा आहे.

दादासाहेब पुण्याला आले असता त्यांचे स्नेही इथल्या आर्यन सिनेमाचे मालक गंगाधरपंत तथा बापूसाहेब पाठक यांच्याशी गप्पा मारताना सहज विषय निघाला. त्यावेळी आर्यन सिनेमात 'शिल्डिग शॅडो' हा चित्रपट दाखविला जात होता. या चित्रपटात समुद्रातील एक जलचर जहाजाचे सहज तुकडे करतो असं एक चित्त थरारक दृश्य होतं. तसं दादासाहेबांनी आपल्या चित्रपटात घालावं अशी त्यांनी कल्पना सुचविली. दादासाहेबांनी हा चित्रपट मुद्दाम पाहिला व त्यांना त्यावरून 'कालिया मर्दन'ची कल्पना सुचली. त्यातून श्रीकृष्ण जीवनातील भाग म्हणजे दादासाहेबांचा प्रिय विषय.

दादासाहेबांच्या ज्येष्ठ कन्या मंदाकिनी यांनी या चित्रपटाच्या वेळच्या काही आठवणी सांगितल्या आहेत. त्या मी ध्वनीमुद्रित करून ठेवल्यात. त्या राष्ट्रीय चित्रपट संग्रहालयात आहेत. त्या म्हणाल्या, 'मी त्यावेळी पाचसहा वर्षांची होते. शाळेतून आले तर जेवायची पानं मांडली होती. माझं पान दादांजवळ होतं. जेवता जेवता दादांनी मला कालिया मर्दनची कथा सांगायला सुरुवात केली. कृष्ण आईवर रागावून घर सोडून जातो, जाताना तो आपल्या घराला नमस्कार करतो आणि यमुनातीरी जायला निघतो. हा प्रसंग दादांनी असा काही रंगवून सांगितला की तो ऐकताना मला रडू अनावर झालं. जराशानं दादांनी मला विचारलं 'सोनू, तू या कृष्णाचं काम करशील का?' मी लगेच हो म्हटलं.'

अशातऱ्हेनं मंदाकिनी (माई)ला श्रीकृष्णाची प्रमुख भूमिका मिळाली. भारतीय रुपेरी पडद्यावर त्याच पहिल्या प्रमुख भूमिका करणाऱ्या बालकलाकार (बालनटी). प्रारंभी माईनी सांगितलेल्या प्रसंगावरच 'कालिया मर्दन'च्या चित्रीकरणास प्रारंभ झाला. माईचा भावपूर्ण वास्तव अभिनय पाहून सेटवरील

सर्वांचे डोळे पाणावले. लेक झकास काम करेल याची दादासाहेबांना खात्री झाली.

'नाशिक जवळच्या घारपुरे घाटावर बाह्यचित्रण चालू होतं. डोहात उडी मारायला मी घाबरू लागले तेव्हा दादा म्हणाले, 'हे बघ पोरी, या सिनेमा धंद्यावर आपलं पोट अवलंबून आहे. आपल्या उदरभरणाचा प्रश्न सुटावा असं तुला वाटत असेल तर प्राणाची पर्वा न करता डोहात उडी मार.' तशी मी लहानच होते पण दादांचे हे शब्द ऐकून मला असा काही आवेश आला आणि मी डोहात उडी मारली. दादांनी तेव्हा असा विचारही केला नसेल की पोरीचं पुढं काय होईल? मी उडी टाकली, पाण्याखाली गेले, माझ्या कपड्यात मासे गेले तरी मी भ्याले नाही. शॉट ओके होताच मला झटपट वर काढण्यात आलं.' वास्तविक डमीवर हे काम भागलं असतं पण दादांनी आपल्या कन्येलाच उडी मारायला लावली.

पाण्याखाली कृष्ण व कालियाचं द्वंद्व चालू आहे. कृष्णानं कालियाला आवळला आहे. पाण्यावर बुडबुडे येतात हा परिणाम दादासाहेबांना साधायचा होता, त्यासाठी त्यांनी एक काचेची पेटी तयार केली होती. त्याची टाकी फुटून एक मोठी काच दादासाहेबांच्या पायात घुसली. भळभळा रक्त वाहू लागलं, त्यांनी स्वतःच मलमपट्टी करून जखम बांधली व ते लगेच कामाला लागले. अशी त्यांची आपल्या कामावर श्रद्धा होती.

'कालिया मर्दन' ३ मे १९१९ रोजी मुंबईच्या मॅजेस्टिक सिनेमात प्रदर्शित झाला, म्हणजे 'राजा हरिश्चंद्र' नंतर बरोबर सहा वर्षांनी. जी मुलगी कॅमेऱ्यापुढं कधीच आली नव्हती त्या आपल्या कन्येकडून दादासाहेबांनी दृष्ट लागण्यासारखं काम करून घेतलं त्याबद्दल पितापुत्रीचं सार्थ कौतुक झालं. माई सांगत, ''श्रीकृष्णाची वेशभूषा करून लोकाग्रहास्तव मला मुंबईला मॅजेस्टिक सिनेमाच्या चबुतऱ्यावर उभी करीत. मला श्रीकृष्णाच्या प्रत्यक्ष रुपात बघायला झुंडीच्या झुंडी लोटत. मी रस्त्यावरून चालले, की भाविक श्रद्धेनं माझ्या पायावर डोकं ठेवीत. मी संकोचून जायची. मुंबईत हा कार्यक्रम काही दिवस रोज चालला होता. मी नाशिकला परतल्यावर तिथंही हाच अनुभव आला.''

'कालिया मर्दन'नं इतकं अफाट यश मिळविलं की मागणी पुरी करायला प्रिंटस् कमी पडू लागल्या. सलग दहा महिने चालून या चित्रपटानं एक विक्रमच केला. पुढं दहा वर्ष भारतात कुठंनाकुठं तो चालूच होता. ज्येष्ठ लेखक, चित्रपट समीक्षक स्व. व्ही. पी. साठे यांनी एका लेखात म्हटलं होतं, 'मी ज्याप्रमाणं फाळक्यांचा लंकादहन पाहून थक्क झालो होतो तद्वत

'कालिया मर्दन'च्या बाबतीतही झालं. विशेषत: कालिया खराखुरा वाटावा इतका तो हुबेहूब साधला होता. त्याचा तो अजस्त्र देह पाहून अंगावर शहारे येत.'

स्व. सुप्रसिद्ध चित्रपट निर्माते, दिग्दर्शक जे. बी. एच. वाडीयांनी 'लंकादहन' पाहून म्हटलं होतं 'हा चित्रपट पाहून मला परदेशी चित्रपटांची मातबरी वाटेना. भारतीय निर्माता-दिग्दर्शक असा चित्रपट करू शकतो याचा सार्थ अभिमान वाटला. तर 'आलम आरा' या पहिल्या भारतीय बोलपटाचे निर्माते, दिग्दर्शक अर्देशीर इराणीनी म्हटलं होतं, हा चित्रपट तुफान चालेल हे मी हा चित्रपट पाहिल्यावर मला जाणवलं. तसेच कालिया मर्दनाबाबत झालं.' मुद्दाम सांगण्यासारखं म्हणजे या चित्रपटाची एक प्रत पुण्याच्या राष्ट्रीय चित्रपटसंग्रहालयात आहे.

सहा हजार फूट लांबीच्या म्हणजे सहा रिळांच्या या मूकपटाच्या प्रदर्शनाला 'श्रीकृष्णजन्मानंतर ८ महिने अवधी लागला कारण कलावंत वृत्तीच्या दादासाहेबांचं व्यावसायिक दृष्टीच्या भागीदारांशी पटेना. दादासाहेब भागीदारांचं म्हणणं पटलं नाही तर ते फटकळपणे बोलायचे. दादासाहेबांचा स्वभाव विक्षिप्त, आग्रही व संतापी होता. व्यवहार आणि कला यांची सांगड त्यांना कधी घालताच आली नाही. प्रभात फिल्म कंपनी सर्वोच्च स्थानी पोचली यार्च महत्त्वाचं कारण कलेबरोबरच व्यवहाराची सांगड संस्थापकांनी हुशारीनं घातली होती.

या चित्रपटाच्यावेळी एक कटू प्रसंग घडला. एका शॉटचे बरेच रीटेक्स झाले ते बघून एक भागीदार ल. ब. फाटक दादासाहेबांना म्हणाले, 'एकेका शॉटचे तुम्ही इतके रीटेक्स करू लागला आणि फिल्मची अशी नासाडी करू लागला तर कंपनीलाही कसं परवडेल? कंपनीला एखाद्या दिवशी तोंड काळं करून दिवाळं काढावं लागेल.'

दादासाहेब हे ऐकून घेतात थोडंच? ते फाटकांना फट्दिशी म्हणाले, ''फाटक, धंद्यानं तुम्ही कॉन्ट्रॅक्टर आहात. चित्रपट कलेतलं तुम्हाला काय कळतंय? चुनखडीचे ब्रास मोजण्याइतकं हे काम सोपं नाही. हे काम आहे बुद्धीचं. ती परमेश्वरानं मला दिलीय तुम्हाला नाही. यासाठी कृपया स्वस्थ बसा आणि मेहेरबानीकरून चुनखडीच्या खर्चाच्या हिशोबात फिल्मच्या खर्चाचा विचार करून माझ्या शॉटमध्ये नाक खुपसू नका.''

काही वेळी धंद्याच्या दृष्टीनं दादासाहेबांचं म्हणणं योग्य असायचं. 'श्रीकृष्ण जन्म', 'लंकादहन' व 'कालिया मर्दन'च्या ३६-३६ प्रतींची गरज होती.

या तिन्ही चित्रपटांच्या निगेटिव्हज् संस्थेचे एक भागीदार मायाशंकर भट्ट यांचे भाचे अमेरिकेत चित्रपट कलेचं शिक्षण घेण्यासाठी गेले असता बरोबर तिकडं प्रिंटस् काढण्यासाठी घेऊन गेले. दादासाहेबांचं म्हणणं होतं 'इथं प्रिंटिंगची सोय असताना अमेरिकेत प्रिंटिंग करून आणण्याचा अनाठायी खर्च करण्याची काय गरज होती?' दादासाहेबांच्या या बिनतोड प्रश्नावर कुणी बोलू शकलं नाही.

तसंच स्टुडिओचा मॅनेजर म्हणून कॅप्टन रोव्हन या अमेरिकन माणसाची १७०० रुपये दरमहा एवढ्या भल्या मोठ्या पगारावर नेमणूक केली. कमीतकमी १५ रुपये व जास्तीतजास्त १०० रुपये पगार देणाऱ्या कंपनीत एवढा लठ्ठ पगार निष्कारण द्यावा हे दादासाहेबांना अजिबात मान्य नव्हतं. ते विचारीत ''आता कंपनीचा वाट्टेल तेवढा पैसा उधळला जातोय हे कंपनीला कसं परवडतं? माझ्याच निर्मितीवर झालेला खर्च तुम्हाला दिसतो.'' तेव्हाही त्यावर कुणी बोलू शकलं नाही.

दादासाहेबांना त्यांच्या कामात ढवळाढवळ केलेली त्यांना कधीच आवडत नसे. कुणी त्यांच्या कामाबद्दल जाब विचारलेला त्यांना मुळीच खपत नसे. याचं कारण असंही होतं दादासाहेबांनी आपल्या पद्धतीनं पण अत्यंत लाभदायक चित्रपट निर्मिती केली होती त्यामुळे त्यांच्या कार्यपद्धतीत चुका दाखविलेल्या स्वयंप्रज्ञा असलेल्या दादासाहेबांसारख्या महान कलावंत तंत्रज्ञाला कसं पटावं आणि कसं मानवावं? त्यामुळं खटके उडणं स्वाभाविकच होतं.

रोजच्या वादावादीला दादासाहेब वैतागले. आपलं भागीदारांशी जमणं अशक्य आहे हे दोन चित्रपटानंतर दादासाहेबांना कळून चुकलं व त्यांनी भागीदारी सोडण्याचा निर्णय घ्यायचं ठरविलं. भागीदारांना दादासाहेबांचा विचार ऐकून त्यांच्यापुढं मोठा प्रश्न उभा राहिला की आता अशी चित्रनिर्मिती कोण करणार? त्यांना थोपवायचे अप्रत्यक्ष प्रयत्न झाले पण दादासाहेबांनी आपला निर्णय प्रत्यक्षात आणला.

☆

# दादासाहेब फाळक्यांचा चित्रपट संन्यास

अस्थिर अवस्थेत असेच काही दिवस गेले. दिलजमाई होण्याची शक्यता दिसत नव्हती. अखेरीस दीर्घकाळ कुठंतरी दूर विश्रांतीला जाण्याचा दादासाहेबांनी निर्णय घेतला व ते सहकुटुंब सहपरिवार काशीला गेले.

बनारसला त्यावेळी किर्लोस्कर संगीत मंडळी आपले हिंदी खेळ करीत होती, तसेच संगीत सम्राट मनहर बर्वे यांचा मुक्कामही जलशांच्या निमित्तानं तिथेच होता. त्यांचे या दोघांशी जुने स्नेह संबंध होते. त्यामुळे त्यांच्या रोज बैठकी होत, नेमके याचवेळी सुप्रसिध्द कादंबरीकार नारायण हरी आपटेही काशीला आले होते. या चौघांच्या संगीत साहित्य नाट्य, सिनेमा यावर प्रामुख्यानं गप्पा होत. अशाच एका बैठकीत दादासाहेबांनी आपला 'रंगभूमी' हे नाटक लिहिण्याचा मनोदय व्यक्त केला.

दादासाहेबांनी अडीच महिन्यात 'रंगभूमी' नाटक लिहून पूर्ण केलं. अर्थात हा विषय बरेच दिवस त्यांच्या डोक्यात होता. ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची बैठक मेच्या शेवटच्या आठवड्यात बनारसला भरणार होती. त्यासाठी लोकमान्य टिळक २७ मे १९२० रोजी मुंबईहून निघाले होते. महात्मा गांधीही त्याच गाडीत होते. बनारसला लोकमान्यांचा मुक्काम २ जूनपर्यंत होता. या मुक्कामात दुसरे एक नेते दादासाहेब खापर्डे यांना केव्हा मोकळा वेळ असेल तेव्हा दादासाहेब आपल्या नाटकातील काही प्रवेश ऐकवीत. प्रचलित नाट्यसृष्टीवरील यथार्थ टीका ऐकून लोकमान्य खूष झालेच. नाटकाचं उद्‌घाटन मीच करीन असं आश्वासनही दिलं पण दुर्दैवानं तो योग आला नाही. याच बैठकीत लोकमान्य टिळकांनी महाराष्ट्र फिल्म कंपनीच्या कलामहर्षी बाबूराव पेंटरांनी बनविलेल्या स्वदेशी कॅमेऱ्याचं फाळक्यांजवळ कौतुक केलं. दादासाहेबांना अगोदरपासून बाबूराव पेंटरांबद्दल कुतुहल वाटत होतं. लोकमान्यांच्या या प्रशंसनेचं दादासाहेबांची उत्कंठा अधिकच वाढली.

दादासाहेबांची ही इच्छा अनपेक्षितपणे लवकरच पूर्ण झाली. 'रंगभूमी' हे त्यांचं नाटक रंगभूमीवर आणण्याच्या दृष्टीनं राजापूरकर नाटक मंडळी

त्यावेळी कोल्हापुरात खेळ करीत होती. या कंपनीचे मालक बाबाजी राणे यांचा दादासाहेबांशी स्नेह होता. त्या दृष्टीनं ते बनारसहून कोल्हापूरला गेले व राजापूरकर नाटक मंडळीच्या बिऱ्हाडी उतरले.

दादासाहेब व बाबाजी राणे दररोज अंबाबाईच्या दर्शनाला जात. या मंदिरात पुढील काळातील निर्माते, लेखक, दिग्दर्शक नानासाहेब सरपोतदार यांची भेट झाली. नानासाहेब सरपोतदार महाराष्ट्र फिल्म कंपनीचे लेखक होते. नानासाहेबांनी फाळक्यांना महाराष्ट्र फिल्म कंपनीला भेट देण्याचं मानानं निमंत्रण दिलं.

ठरल्या दिवशी नानासाहेब दादासाहेबांना 'महाराष्ट्र' मध्ये घेऊन गेले. बाबूराव पेंटर, छायालेखक, कलादिग्दर्शक विष्णुपंत दामले, एस्. फत्तेलाल, व्यवस्थापक, अभिनेते बाबूराव पेंढारकर आदींनी दादासाहेबांचं यथोचित स्वागत केले. त्यांना सर्व स्टुडिओ खातेवार दाखविला. इतकेच नव्हे तर सेन्सॉरने 'सैरंध्री' चित्रपटातील काही भागावर आक्षेप घेऊन काढायला लावलेला भाग जोडून महाराष्ट्रात सर्वत्र गाजलेला चित्रपट दादासाहेबांना दाखविला. नंतर बाबूरावांनी तयार केलेला कॅमेरा दाखवून कसा तयार केला याची माहिती दिली. तयार करताना किती काय काय अडचणी आल्या ते सांगितलं.

कलामहर्षी बाबूराव पेंटरची कल्पकता, कलात्मकता, दीर्घोद्योगीपणा पाहून दादासाहेबांना गहिवरून आलं आणि म्हणाले, ''बाबूराव, मी आता चित्रपटसृष्टीत पाऊल नाही टाकलं तरी चालेल इतकं उत्कृष्ट कार्य तुम्ही तुमच्या कारकिर्दीच्या सुरवातीलाच करून दाखविलंय. सिनेनिर्मितीला लागणारी यंत्रसामग्री स्वदेशात तयार करण्याची माझी अतीव इच्छा आपण प्रत्यक्षात आणली ही गोष्ट आपणास खचित भूषणावह आहे.'' भारतीय चित्रपटसृष्टीच्या जनकाचे हे धन्योद्गार ऐकून बाबूराव पेंटर भारावून गेले. भारतीय चित्रपटसृष्टीच्या या दोन महान शिल्पकारांची भेट अपूर्वच होती.

'रंगभूमी' हे नाटक व्यावसायिक संस्था मागत असताना दादासाहेबांनी त्यांना ते दिलं नाही व १९२२ साली मोठ्या थाटानं मुंबईच्या बालीवाला थिएटरमध्ये प्रथम रंगमंचावर आणलं. दादासाहेबांनी पुण्यात त्याच्या वर्षभर तालमी घेतल्या होत्या पण रंगभूमीच्या उणीवा, समस्या हा नाटकाचा विषय सर्वसामान्यांना अनाकलनीय होता. आता 'बिगबजेट' नाटकाला जेवढा खर्च येतो तेवढा म्हणजे ऐंशी वर्षापूर्वी पाऊण लाख रुपये या नाटकावर खर्च केले होते. आत्ता तो खर्च काही लाखात होईल. यातील विनोद रंगभूमीच्या अनुषंगानं असल्यानं तो प्रेक्षकांच्या डोक्यावरून गेला.

'रंगभूमी' नाटक सात अंकी होतं, त्यामुळं एका रात्री चार अंक व दुसऱ्या रात्री उरलेले तीन अंक अशी त्याची विभागणी केली होती. मुंबई, पुणे व नाशिक या तीनच ठिकाणी हे नाटक रंगभूमीवर आलं, परंतु त्याला अजिबात प्रतिसाद मिळाला नाही. हे नाटक यशस्वी झालं असतं तर दादासाहेब रंगभूमीला निश्चित नवीन काही देऊ शकले असते; पण त्यांचं हे नाटक पहिलं व शेवटचं ठरलं आणि कर्जाचा केवढा तरी बोजा दादासाहेबांच्या डोक्यावर बसला तरीही १८ जुलै १९२६ रोजी कोल्हापूरला साजऱ्या झालेल्या नाट्यसंमेलनाचं अध्यक्षपद देऊन दादासाहेबांच्या या प्रयत्नाची समितीनं दखल घेतली होती. त्यांचे नाट्यविषयक विचार ऐकायला बाबूराव पेंटर आवर्जून उपस्थित होते. दादासाहेबांच्या भाषणातील शेवटचं वाक्य होतं- रंगभूमीद्वारे भारतभूमीची काही सेवा करावी या हेतूनं मी या क्षेत्राकडं वळलो; पण मी हा घेतलेला निर्णय योग्य की अयोग्य याचं मलाच गूढ आहे.

कलकत्त्याचे सुस्थिर निर्माते, दिग्दर्शक, प्रदर्शक, वितरक जे. एफ्. मादन दादासाहेब 'रंगभूमी'च्या निर्मितीत गुंतले असताना भेटून गेले होते व चित्रपट व्यवसायात पुनरपि येण्याची विनंती केली होती, एवढेच नव्हे तर दादासाहेबांना कलकत्त्याला येऊन चित्रपट निर्मिती करावी असं आग्रहाचं नम्र निमंत्रण दिलं होतं. हवं तेवढं आर्थिक सहाय्य करण्याचीही तयारी दाखविली होती, पण दादासाहेबांच्या स्वभावानुसार त्यांनी मादनना उत्तर दिलं, 'चित्रपट व्यवसायाचा मला उबग आला आहे त्यामुळं माझा तिकडं वळण्याचा अजिबात विचार नाही. मी चित्रपट संन्यास घेतला आहे असं समजून चला.' अशा तऱ्हेनं त्यांनी मादनना नकार दिला.

त्याच काळात 'संदेशकार' अच्युत बळवंत कोल्हटकरांनी दादासाहेबांना पत्र पाठवून तुम्ही चित्रपटसृष्टीचे जनक. तुम्ही हे काय चालविलं आहे? अहो, जनकानंच असा सात्विक संतापाच्या भरात वैराग्याचा मार्ग पत्करावा का? तुम्ही परत या. तुम्हीच उभारलेल्या स्वदेशी चित्रपट व्यवसायाला तुमची नितांत गरज आहे. ज्यासाठी तुम्ही केवढा तरी त्याग केलाय, अनेक दिव्यातून पार पडून हा स्वदेशी व्यवसाय सुरू केलात आणि तुम्हीच त्याच्याकडं कशी पाठ फिरविता?' त्यावर दादासाहेबांनी कोल्हटकरांना कळविलं, 'मी चित्रपट व्यवसायासाठी मेलो आहे. पुन्हा चित्रपट व्यवसायात पाऊल टाकण्याचा माझा विचार नाही.'

कोल्हटकरांनी आपल्या 'संदेश' वृत्तपत्रात 'दादासाहेब फाळके यांचं निधन या शीर्षकाखाली दादासाहेबांचं पत्र छापलं होतं. त्यांच्या या पत्रानं महाराष्ट्रात

खळबळ उडाली. दादासाहेबानी चित्रपटसृष्टीत परत यावं म्हणून 'संदेश'कडं अनेक पत्रं आली. ती सारी पत्रं 'संदेश'मध्ये प्रसिद्ध झाली. ते अंक काशीला दादासाहेबांकडं पाठविण्यात आले. ती पत्रं वाचून दादासाहेबांचं मन हेलावलं व आपल्या असंख्य चाहत्यांच्या आपल्यावरील अपार प्रेमासाठी आपण आपला निर्धार बाजूला ठेवला पाहिजे असं दादासाहेबाना वाटू लागलं आणि ते त्याना अंमलातही आणलं. काशीहून ते नाशिकला परत आले पण पुढं काय करायचं हे त्यांचं निश्चित झालं नव्हतं, फक्त आपण जन्माला घातलेल्या चित्रपट व्यवसायात परत जायचं एवढंच त्यांनी मनाशी पक्क ठरवून ते परत आले होते.

☆

# हिंदुस्थान फिल्म कंपनीत पुनरागमन!

दादासाहेब काशीला गेल्यावर वामन श्रीधर आपटे सोडून बाकीचे चार भागीदार कंपनीत पहिल्यासारखं लक्ष घालेनासे झाले. दादासाहेब नाशिकला परत आलेत हे आपट्यांना कळल्यावर पूर्वी उल्लेख येऊन गेलाय, त्या आर्यन सिनेमाच्या बापूसाहेब पाठकांना मध्यस्थी घालून दादासाहेबांना निर्मिती प्रमुख व तांत्रिक सल्लागार म्हणून मानाने बोलावलं. आलेली संधी दादासाहेबांनी घेतली; पण दादासाहेबांना दरमहा एक हजार रुपये पगारावर नोकरीला ठेवून घेतलं. वास्तविक दादासाहेबांच्या मानी स्वभावाला नोकर म्हणून राहणं ही एक तडजोड होती पण याला ते तयार कसे झाले हे एक कोडंच होतं. ही घटना १९२२ सालातील.

परत आल्यावर दादासाहेबांनी दिग्दर्शित केलेला 'संत नामदेव' तो २८ ऑक्टोबर १९२२ रोजी प्रदर्शित झाला. दादासाहेब पहिल्या सारखे कामात रमत नव्हते. परत कलाविरुद्ध धंदा हा वाद सुरू झाला. दादासाहेब नोकरीला राहिले असले तरी मालक त्यांना बरोबरीच्या नात्यानं वागवीत. त्यांच्या तैनातीसाठी घोडागाडीसारख्या सुखसोयी उपलब्ध करून दिल्या होत्या.

सर्व काही होतं; परंतु कंपनीतील धंद्याची चौकट दादासाहेबांना जाचक वाटत होती. खटके उडाले की ते घरी जाऊन बसत. राग शांत झाला की ते परत स्टुडिओत येत. ते संतापून निघून चालले तर मालक त्यांना अडवीत नसत अगर परत आले तर कोणतीही हरकत घेत नसत. थोडक्यात दादासाहेबांना जाण्यासाठी व येण्यासाठीही दारे उघडी असत.

हिंदुस्थान फिल्म कंपनी व्यवसायाच्या दृष्टीनं भरभराटीला आली होती. त्याचे श्रेय वामनराव आपट्यांच्या कुशल नेतृत्वाला आहे. दादासाहेबांच्या शिष्यांकडून त्यांच्या गैरहजेरीत त्यांनी चित्रपट निर्मिती करून घेतली त्यामुळं कंपनीचं सरासरी उत्पन्न दरमहा चाळीस हजार रुपये होतं. प्रत्येक चित्रपटाला साधारणतः दहा हजार रुपये खर्च येई. आपल्या व्यापारी धोरणाला धक्का न लावता वामनराव आपट्यांनी दादासाहेब फाळक्यांसारख्या शीघ्रकोपी, मानी

कलावंताला वारंवार सांभाळण्याइतकी हुशारी, ऋजुता प्रगट केली होती त्यावरून आपटे कसे धोरणी होते हे लक्षात येतं. दादासाहेब १९२९ सालापर्यंत हिंदुस्थान फिल्म कंपनीत होते. या ७ वर्षात ४४ चित्रपटांचे हिंदुस्थान फिल्म कंपनीसाठी त्यांनी दिग्दर्शक म्हणून काम केलं. यावरून वर्षाला सहासात चित्रपट त्यांनी दिग्दर्शित केले. दादासाहेब आपला पौराणिक अथवा संतपट असेल तर निदान अभ्यासू कीर्तनकारांना निमंत्रित करून त्यांच्याकडून त्या विषयावर कीर्तनाचा कार्यक्रम करीत व त्यांच्याकडून त्या विषयावर कीर्तन करवून घेत, त्यातील वैशिष्ठ्यपूर्ण प्रसंगाची नोंद करून घेत, त्याचा त्यांना पटकथा लिहिताना फार उपयोग होई.

१९२६ सालच्या 'संत एकनाथ' या चित्रपटात संन्याशाच्या मिरवणुकींचा एक प्रसंग आहे. पण संन्याशाची भूमिका करणारा कलावंत मुंडण करायला तयार नव्हता, त्याला मुंडण करण्याची लाज वाटत होती. दादासाहेब त्याच्यावर न चिडता त्यांनी स्वत:चं मुंडण करून घेतलं, ते बघून लाजेकाजेवास्तव का होईना तो कलावंत व इतरांनीही मुंडण मुकाट्यानं करून घेतलं.

दादासाहेबांचा नेटकेपणा, कडक शिस्त, व व्यवस्थितपणा याचं एक अजब उदाहरण आहे. ते चित्रपटाची तालीम घेण्यासाठी स्टुडिओत आले. तालीम सुरू करण्यापूर्वी आपल्या कार्यालयात गेले, पाहातात तो दौतीचं बूच गायब. तापट दादासाहेबांचं माथं भडकलं, एवढासासुद्धा गलथानपणा त्यांना खपत नसे. तालीम राहिली बाजूला. सर्वांना त्यांनी बूच शोधायला कामाला लावलं. तो सापडेपर्यंत तालीम नाही असं फर्मान काढलं. बराच वेळ शोधाशोध करूनही बूच सापडेना तेव्हा त्या दिवशी त्यांनी तालीमच रद्द करून टाकली.

दादासाहेबांच्या कल्पकतेच्या काही आठवणी सांगण्यासारख्या आहेत. त्यांच्या 'भक्त दामाजी' चित्रपटात एक दृश्य आहे. एक पत्र हवेतून तरंगत्या पोथीवर पडते; मग बाजूला गेलेलं पोथीचं पान पुन्हा होतं त्या जागेवर येतं व पत्र झाकलं जाते. पत्र हवेतून तरंगत पोथीवर येऊन पडतं इथंपर्यंतचं छायाचित्रण स्वत: दादासाहेबांनी केलं. पोथीचं पान पुन्हा जागेवर येतं याचं चित्रण छायालेखकाला करायला सांगितलं. रश प्रिंट बघताना छायालेखकानं घेतलेला शॉट तांत्रिकदृष्ट्या बरोबर होता; परंतु पोथीचं पान हा कागदाचा तुकडा आहे, तो समांतर रेषेत कसा येईल? तो हेलकावे खायला हवा. अभ्यासू व निरीक्षणवृत्ती असलेल्या दादासाहेबांनी तो शॉट घेऊन दाखविला.

'द्रौपदी वस्त्रहरण' या चित्रपटाच्या चित्रीकरणाच्यावेळी दोन सैनिकांच्या

द्वंदाचं दृश्य आहे, पण ते द्वंद्व खोटं खोटं वाटत होतं, तेव्हां दादासाहेबांनी एक शक्कल लढविली. एकाला बाजूला नेऊन दादासाहेबांनी सांगितलं तुला त्याच्याबरोबर लढायला का सांगितलं ठाऊक आहे का? माझ्याकडं येऊन तुझ्याबद्दल चहाड्या करतो, वाईटसाईट बोलतो आता त्याला चांगली अद्दल घडव, हेच दुसऱ्याला सांगितलं. त्याचा परिणाम असा झाला की दोघं समोरासमोर उभे राहिले व दादासाहेबांनी कॅमेरा स्टार्ट म्हणून सांगितल्यावर दातओठखात, एकमेकावर शिव्या देत तुटून पडले आणि त्यांचं खरंच द्वंद्व त्वेषानं सुरू झालं. एकमेकाला बदडून काढलं. दादासाहेबांना मनासारखं दृश्य मिळालंच. त्यांनी दोघांनाही बाजूला केलं व त्यांना सांगितलं की, 'बाबानो, मला हवा तशा शॉट हवा होता म्हणून मी तुमच्या दोघात आग लावली. तुम्ही दोघंही चांगलेच आहात. दोघांपैकी एकानंही मला दुसऱ्याविषयी काहीही सांगितलं नाही. मी सांगितलं ते विसरून जा.' ते दोघं एकमेकाकडं बघतच राहिले.

याच चित्रपटाच्या वेळची हकिगत. दादासाहेबांनी दरबारचा मोठा सेट लावला होता. चित्रण आटोपलं. रशप्रिंट बघताना सेटला एक फ्लॅट कमी लागलाय असं त्यांना जाणवलं. वास्तविक ते इतर कुणाच्याही लक्षातसुद्धा आलं नव्हतं पण दादासाहेबांना कुठलं पटायला? त्यांनी तो फ्लॅट लाऊन पुन्हा सर्व चित्रीकरण केलं. असा वेळ आणि पैसा खर्च व्हायचा.

१९२७ सालच्या 'रुक्मांगद मोहिनी' चित्रपटात रुक्मांगद मोहिनीचं विमानातून आगमन होतं असं दृश्य दादासाहेबांना घ्यायचं होतं. त्यासाठी स्टुडिओत दोरखंड बांधून एक विमान तयार करवून घेतलं होतं; पण दादासाहेबांना वाटलं, समजा दोरखंड तुटला तर भयंकर प्रसंग ओढवेल. दक्षता म्हणून त्यांनी कॅमेऱ्याच्या कक्षेत येणार नाही असं सर्कशीत काळजी घेतात तसं जाळं जमिनीच्यावर थोड्याश्या अंतरावर लाऊन घेतलं.

सांगायची आश्चर्याची गोष्ट म्हणजे ते विमान खरचं दोर तुटून खाली कोसळलं, पण सुरक्षा म्हणून खाली जाळं लावल्यानं दुर्घटना टळली. दोन्ही कलावंत बचावले. पुन्हा दुसऱ्या दोरखंडापासून विमान दुरुस्तीपर्यंत सर्व खटाटोप करावा लावला, पुन्हा चित्रणाची सिद्धता झाली परंतु या कलावंतांनी एवढा धसका घेतला होता की ते विमानारूढ व्हायला तयार होईनात, शेवटी स्वतः दादासाहेबांनी विमानातून यशस्वी उड्डाण करून दाखविलं. तेव्हां भीत भीत का होईना ते दोन कलावंत तयार झाले व दादासाहेबांना हवं तसं दृश्य घेणं शक्य झालं.

दादासाहेब कोपीष्ट होतेच पण आपला कार्यभाग साधण्यासाठी डोकं शांत ठेवीत. द्रौपदी वस्त्रहरणच्या वेळचा आणखी एक प्रसंग. लाक्षागृहाचा सेट नाशिकच्या तांबट घाटावर उभा करण्यात येत होता. काम जवळजवळ पूर्ण झालं होतं. या सेटसाठी योग्य अशी जमीन रंगवायची राहिली होती, त्यासाठी काही पेंटर्सची योजना केली होती, पण चित्रीकरणाच्या वेळेपर्यंत रंगवून होणं त्यांना शक्य दिसेना तेव्हा दादासाहेबांनी स्वत: ब्रश हातात घेतला व जमीन रंगवायला सुरूवात केली. ते कसबी चित्रकार होतेच. स्वत: दादासाहेब कामाला लागलेले पाहून इतर रंगाऱ्यांनाही स्फुरण चढलं व रंगवायचं काम वेळेत पूर्ण झालं.

१७ मे १९२४ रोजी दादासाहेबांचा 'म्युनिसिपल निवडणुका' हा वैशिष्ट्यपूर्ण चित्रपट प्रदर्शित झाला होता. तेव्हाही निवडणुकांचं स्वरूप आत्तापेक्षा फार वेगळं नव्हतं हे दिसून येतं. त्याच दिवशीच्या 'नवाकाळ' मध्य पुढील मजकूर या चित्रपटाबद्दल प्रसिध्द झाला होता.

तुम्ही आपली मते कुणाला द्याल? मि. दातकोरे? की मि. भीकमागे? हे दोघे अब्रूदार उमेदवार म्युनिसिपालिटीत निवडून दिल्यावर तुमच्या दरेक मागण्या पुऱ्या करण्याचे आश्वासन देत आहेत. म्युनिसिपल निवडणूक हिंदुस्थान फिल्म कंपनीनं जाहीरपणे प्रजेला स्वत:चे हक्काची जाणिव व्हावी त्याचप्रमाणं खोटी अश्वासनं देणाऱ्यापासून लोकांनी सावध राहाण्यासाठी हा खास तयार केलेला हास्यकारक व भरपूर देखाव्यांचा चित्रपट!

म्युनिसिपालिटीचे निरनिराळे उमेदवार आपापल्या पक्षाचे व जातीचे उमेदवार पुढं आणण्यासाठी कसकशा युक्त्या करीत आहेत त्या युक्त्या या चित्रपटात दाखविण्यात आल्या आहेत. कुसुमपूरचे दोन उमेदवार दातकोरे व भीकमागे यांनी कमालच करून सोडली. त्यांनी आपली लायकी सिद्ध करण्यासाठी केलेली भाषणं व निवडून येण्यासाठी केलेला भयंकर खटाटोप व युक्त्या तर तुम्ही कधीच पाहिल्या नसतील.

मॅजेस्टिक सिनेमावर १८ मे १९२४ रोजी पुढील मजकूर लिहिला होता- फाळके यांचे खास देखरेखीखाली वेडगळ उमेदवारांच्या माकडचेष्टा कशा होतात ते यामध्ये हुबेहुब दृष्टीस पडेल अशा तऱ्हेने म्युनिसिपल निवडणुकांची यथार्थ व पुरेपुर खिल्ली यात उडविली आहे, यावरून दादासाहेब फाळक्यांच्या विनोदबुद्धीची कल्पना प्रेक्षकांना तेव्हा आली होती.

१९२९ सालपर्यंत दादासाहेब जरी हिंदुस्थान फिल्म कंपनीत होते तरी पुन्हा दोनवेळा कंपनी सोडून गेले होते. एकदा गेल्यावर परत आल्यावर

दादासाहेबांना हजाराऐवजी दरमहा पाचशे रुपये पगार त्यांना देऊ केला व त्यावरही ते राजी झाले. दुसऱ्यावेळी तर जाऊन परत आले तेव्हा तर दरमहा अडीचशेच पगार त्यांना सांगितला तरी त्यांनी मान्य केला याचं रहस्य समजत नाही. हे ते कसं व का मान्य करीत होते?

एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की 'कालिया मर्दन' पर्यंत दादासाहेबांनी दृष्ट लागण्यासारखं यश संपादन केलं होतं. त्यांचं नाव भारतभर तळपत होतं. परदेशातही दादासाहेबांच्याबद्दल आदर होता, मानमान्यता होती पण असं यश नंतर त्यांच्या वाट्याला येऊ शकलं नाही, जरी त्यांनी पुष्कळ चित्रपटांचं दिग्दर्शन पुढं केलं होतं तरी.

याचं कारण असं असू शकेल 'लंकादहन' पर्यंत स्वत:च्या चित्रसंस्थेत ते सर्वेसर्वा होते. हिंदुस्थान फिल्म कंपनीत दादासाहेब आपल्या पद्धतीनं चित्रपट काढू शकले असले तरी त्यांच्या भागीदारांशी कुरबुरी सुरू झाल्या. स्वत:च्या संस्थेत त्यांना काही प्रश्न भेडसावीत होते तरी मुख्य समस्या असायची ती भांडवलाची, तरी यासारख्या अडचणीवर मात करून दादासाहेबांनी अविस्मरणीय चित्रपट सादर केले. हिंदुस्थान फिल्म कंपनीत आर्थिक अडचण नव्हती परंतु भागीदारांशी पटत नसल्यानं ते मानसिक स्वास्थ्य गमवून बसले होते. त्यामुळं आपल्या कामात ते हवं तेवढं लक्ष केंद्रित करू शकले नाहीत. दिग्दर्शकाला मनस्वास्थ नसेल तर त्याच्या हातून सरस कलाकृती निर्माण होणं शक्य नाही.

हिंदुस्थान फिल्म कंपनीत अशा स्थितीत राहण्यापेक्षा स्वतंत्र चित्रपट संस्था काढावी असं त्यांच्या मनानं घेतलं. हिंदुस्थान फिल्म कंपनीचा कारभार उद्योगपती वामन श्रीधर आपटे संस्थेचा कारभार एकटे पाहू शकत होते. ते दादासाहेबांना शक्य तेवढं सांभाळून घेत होते. पण दादासाहेबांच्या भांडवलासाठी मुंबई, इंदौर, उज्जैन अशा वाऱ्या सुरू झाल्या ही गोष्ट आपट्यांच्या कानी गेली तेव्हा त्यांना स्पष्टपणे बजावलं, 'तुम्ही कंपनीचे नोकर आहात. नोकरीत असताना तुम्ही असं काही करणं अपेक्षित नाही. असं काही करायचं असेल तर नोकरी सोडा व नोकरी करायची असेल तर हे उपद्व्याप लगेच थांबवा.' ही कानउघाडणी दादासाहेबांच्या वर्मी लागली. ही परखड भाषा त्यांना इतकी झोंबली की त्यांनी हिंदुस्थान फिल्म कंपनीच्या नोकरीचा ताबडतोब राजिनामा दिला. पुन्हा फिरकायचं नाही असं ठरवून. इथून पुढं दादासाहेबांच्या चित्रपट कारकिर्दीच्या अखेरच्या पर्वाचा प्रारंभ झाला.

बाबूराव पेंटरांचे चित्रपट १९२० सालापासून प्रदर्शित होऊ लागले होते.

त्यातील वास्तवता, कलात्मकता, भव्यता, तंत्र या बाबतीत ते उजवे होते. त्याचं महत्त्व भारतभर वाटलं होतं. पुढं प्रभात फिल्म कंपनीची स्थापना करून जगभर कीर्ती मिळविलेले विष्णुपंत दामले, शेख फत्तेलाल, व्ही. शांताराम बाबूरावांचे शिष्य होते. नानासाहेब सरपोतदार, ना. ह. आपटे, विष्णुपंत औधकर, शिवराम वाशीकर, भालजी पेंढारकर, ना. सी. फडके या सारख्या लेखकांचं बाबूरावांना सहकार्य होतं. दादासाहेब एकटेच लढत होते.

☆

# 'सेतुबंधन' आणि 'गंगावतरण'

स्वतंत्र संस्था सुरू करण्यासाठी दादासाहेब हिंदुस्थान फिल्म कंपनीचे भूतपूर्व भागीदार माया शंकर भट्ट यांना भेटले व 'फाळके डायमंड कंपनी' नावाची नवीन संस्था सुरू करण्याचा मानस व्यक्त केला. दादासाहेबांच्या कर्तृत्वावर त्यांचा विश्वास होता. पण त्यांच्या खर्चाला काही मर्यादा नसत. माया शंकर भट्ट हेही जाणून होते की त्यांचा सर्व पैसा निर्मितीवरच खर्च होतो. चैनीत किंवा अन्य कशात उधळला जात नाही. चित्रपटात भव्यता, वातावरणाचा खरेपणा यासाठीच खर्च होतो म्हणून माया शंकर भट्टनी त्यांना ५० हजार भांडवल द्यायचं मान्य केलं. त्याकाळात ही रक्कम फारच मोठी होती. भट्टनी या रकमेत चित्रपट पुरा झाला पाहिजे अशी रास्त अट घातली. दादासाहेबांनी ते मान्यही केलं. रामायणातील 'सेतुबंधन' कथा भागावर चित्रपटाची तयारी सुरू केली.

हंपी वगैरे ठिकठिकाणी तिथल्या विविध शिल्पाचं चित्रीकरण केलं. दादासाहेब सीतेच्या शोधात होते. एक सुस्वरूप तरुणी येऊन दादासाहेबांना भेटली. त्यांना विचारू लागली, 'मी काम करीन पण मला भरजारी शालू, अंगभर दागिने घालायला मिळतील का?' दादासाहेबांनी खुलासा केला, 'माझ्या चित्रपटातील सीता वनवासी आहे, तिच्या अंगावर जाडेभरडे कपडे असतील. वनवासी सीतेच्या अंगावर कुठले आलेत दागिने.' हे ऐकून त्या तरुणीनं काम करायला नकार दिला. त्या काळात स्त्रिया कामं करू लागल्या होत्या. तरी विशिष्ट भूमिकेला योग्य स्त्री कलाकार मिळणं अवघडच होतं.

या तरुणीचा विनोद पुढच आहे. तिनं दादासाहेबांना विचारलं, 'मग माझ्या थोरल्या बहिणीला काम देता का? ती शरीरानं धिप्पाड आहे. घोड्यावर बसते, पोहण्यात पटाईत आहे, झाडावरसुद्धा झटपट चढते.' दादासाहेबांनी सांगितलं, 'सीतेच्या कामाला अशी मुलगी काय करायचीय?' त्यावर ती तरुणी लगेच म्हणाली, 'मग तिला मारुतीच्या बायकोचं काम द्या ना, त्याला फिट्ट दिसेल' दादासाहेबांनी कपाळावर हात मारून घेतला आणि म्हणाले,

'मारुतीला बायको होती का, हे रामायण चाळून बघतो आणि मग तुला कळवितो.'

दादासाहेब मद्रासकडून येताना बेळगावहून सीतेसाठी दिसायला बरी अशी तरुणी घेऊन आले. रामायणातील काळाला साजेसे भव्य आणि कलात्मक सेटस् उभारण्याचा दादासाहेबांनी चंग बांधला होता. दक्षिणेत चित्रित करून आणलेली मंदिरं, शिल्प या बरहुकूम सेटस् उभारण्याची दादासाहेबांची योजना होती.

स्टुडियोतला सगळा कामगारवर्ग सेट उभारण्यात गुंतला होता. अमक्यानं अमकच काम करायचं असा प्रकार नव्हता. धुमधडक्याकानं काम चालू होतं. काहीतरी अवाढव्य घडत होतं. दादासाहेब स्वत:ही राबत होते. त्यांना जेमतेम तीन-चार तास झोप मिळत होती. दिलेल्या रकमेत हे सारं बसवायचं होतं याचं भान कामाच्या दवडण्यात दादासाहेबांना राहिलं नाही. भांडवल संपलं. ठरल्याप्रमाणं माया शंकर भट्ट आणखी रक्कम द्यायला तयार होईनात. काम थंडावलं. इतके अपार कष्ट घेतलेले वाया जाण्याची वेळ आली. दादासाहेबांच्या आणखी भांडवल मिळविण्याच्या खटपटीला यश मिळत नव्हतं. कामगारांचे पगार थकले. दादासाहेबांना पुन्हा एकदा आर्थिक अडचणीला सामोरे जावं लागलं.

वर्ष लोटलं तरी चित्रपट पूर्ण होण्याचं काहीच लक्षण दिसेना. कामगारांचे पगार थकवून संस्था टिकविणं व चालविणं दादासाहेबांना फार जड जाऊ लागलं. कामगारांचा तगादा सुरू झाला. बिचारे दादासाहेब वैतागले. अगतिकतेनं कामगारांसमोर किल्ल्या ठेऊन म्हणाले, ''ही कंपनी आणि तिचं सामान तुम्ही ताब्यात घ्या. ते विकून तुमचे पगार वसूल करा. माझ्या कुटुंबियासह मी बाहेर पडायला तयार आहे. याशिवाय मला दुसरा मार्ग दिसत नाही.''

चित्रपटसृष्टीच्या जनकावर दुर्दैवाचे आघात कसे आणि किती प्रकारे होत गेले याची कल्पना येते. अशा कठीण समयी वामनराव तथा तात्यासाहेब आपटेच दादासाहेबांच्या मदतीला धावले. दादासाहेबांनी उभारलेले सेटस् पाहून तात्यासाहेब खूष झाले. ज्या संस्थेकडं पुन्हा फिरकणार नाही अशी प्रतिज्ञा करून बाहेर पडलेल्या दादासाहेबांना आपट्यांनी पुढे केलेला मदतीचा हात नाकारण्याची परिस्थितीच नव्हती. तात्यासाहेब आपटे झालं गेलं विसरून दादासाहेबांच्या पाठीशी उभे राहिले; मनाचा मोठेपणा दाखविला. त्यांनी पुढं केलेला हात स्वीकारणचं भाग होतं.

वामनराव आपट्यांनी दादासाहेबांच्या नाशिकच्या बालाजीच्या चाळीजवळील

स्टुडियोचा ताबा घेतला व सारं सामान हिंदुस्थान फिल्म कंपनीत हलविण्यात आलं. कामगारांचे थकलेले पगार हिंदुस्थान फिल्म कंपनीतून मिळाले. काही अटीवर दादासाहेब हिंदुस्थान फिल्म कंपनीचे पुन्हा भागीदार झाले. 'सेतुबंधन' हिंदुस्थान फिल्म कंपनीच्या नावाखाली मुंबईच्या इंपिरिअल फिल्म स्टुडियोत पूर्ण करण्याचं निश्चित झालं. सारा लवाजमा नाशिकहून मुंबईला रवाना झाला.

मुंबईला जाताना राक्षस व वानर यांना साजेशी शरीरयष्टी असणारे चाळीस तगडे जवान दादासाहेब बरोबर घेऊन गेले. या सर्वांना एके दिवशी इंपिरिअल स्टुडियोत मेकअपसाठी नेण्यात आलं. धोतर, सदरा, कोट, टोपी अशा पेहेरावतला हा ताफा बघून 'इंपिरिअल'चा नटवर्ग व कर्मचारी 'ये कौन घाटी पकडके लाये है?' म्हणून त्यांची टिंगल सुरू केली.

त्यावेळी नानासाहेब सरपोतदार इंपिरिअलचा देवकी हा पौराणिक चित्रपट दिग्दर्शित करीत होते. तेव्हा रंगभूमीवर व चित्रपटात शिवाजीराजे म्हणून प्रसिद्धीस आलेले भाऊराव दातार यात महत्त्वाची भूमिका करीत होते. त्यांनी या लोकांना समज दिली. 'इनकी ऐसी मजाक मत करो, ये लोक मुँहसे बात नही करते. टांगेमें हात डालकर पटक देते है, समझे?' तेव्हा सारे टिंगलखोर चूप झाले. रंग, वेशभूषा झाल्यावर या जवानांच्या ताफ्याच्या पिळदार धिप्पाड शरीरयष्टी बघायला सारा स्टुडियो लोटला तेव्हापासून सगळेजण त्यांना 'दादा, दादा' म्हणून आदबीनं संबोधू लागले.

सर्व सुरळीत होऊन चित्रीकरणाला प्रारंभ झाला. परंतु दादासाहेबांची संकट परंपरा खंडीत झाली नाहीच. पाचसहा दिवसाचं चित्रिकरण पार पडलं आणि मंदोदरीचं काम करणारी इकबाल नावाच्या नटीनं कलकत्याच्या एका चित्रपटाचं दोन तीन दिवसांचे शूटिंग बाकी आहे ते संपवून लगेच परत येते म्हणजे त्यांचा चित्रपट पूर्ण होईल असं सांगितलं. त्यावर दादासाहेबांनी विश्वास ठेवला. इकबाल कलकत्त्याला रवाना झाली.

इकबाल आज येईल उद्या येईल म्हणून सातआठ दिवस वाट बघितली तरी तिचा पत्ता नाही. तिच्या जागी दुसरी नटी घेऊन काम सुरू करावं म्हटलं तर इकबालचं झालेलं सर्व चित्रण रद्द करून पुन्हा नव्यानं सेट मांडून चित्रीकरण करावं लागलं असतं व ते न परवडणार होतं. याचा अर्थ तेव्हापासून मुंबईच्या चित्रपट सृष्टीतील नट्या निर्माते-दिग्दर्शकांना किती अडचणीत आणित याचं हे उदाहरण आहे.

तिकडं त्या चाळीस दांडग्यांचा खर्च अंगावर पडत होता. शेवटी दोन महिन्यांनी इकबाल आली. मग पुन्हा चित्रीकरणाला प्रारंभ झाला. इतके

दिवस वेळ व खर्च अगदी वाया गेला. दादासाहेब कडक शिस्तीचे; पण पडता काळ लक्षात घेऊन त्यांच्यासारख्या तत्त्वनिष्ठ तंत्रज्ञ, कलावंताला निमूटपणे स्वस्थ बसावं लागलं. दादासाहेब पहाडासारखे खंबीर म्हणून पाठोपाठचे आघात सहन करू शकले.

दादासाहेब वेळ व शब्द पाळण्याच्या बाबतीत किती काटेकोर होते याचं एक उदाहरण सांगण्यासारखं आहे. आऊटडोअर शूटिंग पांडवलेणी इथं ठरलं होतं. सर्वांनी ठीक पाच वाजता चित्रणस्थळी पोचायचंही ठरलं होतं. दादासाहेब अगदी वेळेवर तिथं पोचले होते. पण कलावंताना घेऊन येणारी गाडी या ना त्या कारणानं पंधरावीस मिनिटं उशीरा पोचली. झालं. दादासाहेबांचा मूड गेला व ती गाडी तशीच त्यांनी माघारी पाठविली व त्या दिवसाचं चित्रीकरण रद्द करून टाकलं. इतके ते कडक होते.

बबनराव सूर्यवंशी हा अंगदाची भूमिका करीत होता. एका प्रसंगात त्याला झाडावरून खाली उडी मारायची होती. सूर्यवंशीला झाडावर चढता येत नव्हतं. पण नाही म्हणायची सोय नव्हती. इतरांच्या सहाय्यानं सूर्यवंशी कसाबसा झाडावर चढला. एवढ्या उंचावरून उडी मारायची असल्यानं अपघात होऊ नये म्हणून खाली जाळं धरलं होतं. तरी एवढ्या उंचावरून उडी मारायला सूर्यवंशी घाबरत होता.

कॅमेरा सुरू झाला. सूर्यवंशीनं देवाचं नाव घेऊन उडी टाकली पण भीतीनं प्रथम डोळे मिटले. खरंतर वरून पडण्याच्या गतीनं डोळे मिटलेले प्रेक्षकांच्या लक्षातही आलं नसतं, पण दादासाहेबांच्या नजरेतून ते सुटलं नव्हतं. त्यांनी विचार केला, यदाकदाचित ते कोणा चोखंदळ प्रेक्षकाच्या लक्षात आलं तर? अंगदासारखा शूर उडी मारताना घाबरला हे त्याच्या शौर्याला साजेसं नाही असचं त्याला वाटेल. छायालेखकांसह सगळ्यांनी सांगून पाहिलं की कुणाच्याही लक्षात येणार नाही पण दादासाहेब थोडेच ऐकायला? सूर्यवंशीला पुन्हा झाडावर चढविण्यात आलं. यावेळी मात्र त्यानं डोळे कटाक्षानं उघडे ठेवले. पूर्ण समाधान झाल्याशिवाय दादासाहेब कधीच ओके म्हणत नसत.

'सेतुबंधन'चं काही चित्रण रत्नागिरीत सागरतीरी झालं होतं. काही मंडळींनी तिथं स्वस्त मासे मिळतात म्हणून खरीदले व आपली जेवणाची पंगत वेगळी मांडली; कारण दादासाहेब संपूर्ण शाकाहारी होते. दादासाहेबांना ही वेगळी पंगत मांडलेली मुळीच आवडलं नाही. कारण सर्वांची पंगत नेहमीच एकत्र व्हायची. ते जातीभेद कधीच मानत नव्हते. त्यांच्या नोकरवर्गात सर्व जाती जमातीचे लोक होते. त्यांनी त्या पंगतवाल्याना आपल्याबरोबर पंगतीला येऊन

बसायला फर्मावलं. जोपर्यंत कंपनीचा मुक्काम तिथं होता तोवर एकत्रच पंगत होत होती. एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. दादासाहेब तापट होते. रागाच्या भरात ते वाट्टेल ते बोलायचे पण जराशानं राग विसरून जायचे. हे ज्यांना ठाऊक होते ते दादासाहेब कितीही टाकून बोलले तरी मनावर घेत नसत.

चित्रचमत्कृती (ट्रिक फोटोग्राफी) यातील दादासाहेबांची कल्पकता, कौशल्य अजब होतं, हे या चित्रपटात पुन्हा दिसून आलं, 'सेतुबंधन' मध्ये राक्षसाचं मुंडकं धडापासून वेगळं होतं पण मायावी शक्तीनं ते पुन्हा धडाला पूर्ववत चिकटत असं त्यांनी दाखविलं होतं. ते पाहून प्रेक्षक अचंबित होत.

इंपिरिअल स्टुडियोत दादासाहेबांना धबधब्याचं दृश्य चित्रित करायचं होतं. यासाठी त्यांनी बरीच वाळू व हीटर्स मागविले. दादासाहेबांचा हा खटाटोप पाहून स्टुडिओत सारेजण 'म्हाताऱ्याचं डोकं फिरलंय' म्हणून कुचेष्टा करायला लागले. या हीटर्स व वाळूचं काय करणार आहेत ते कुणालाच उलगडेना. दादासाहेबांनी स्टुडियोतील नकली धबधब्यावर ती वाळू सतत कौशल्यानं फेकून धबधब्याच्या पाण्याला खराखुऱ्या धबधब्यासारखा फेस निर्माण केला होता व हीटर्सचा उपयोग करून धबधब्याच्या खळखळाटाच्या आवाजाचा परिणाम साधला होता. पडद्यावर हे दृश्य बघताना सारेच अवाक् होत कारण दादासाहेबांनी बनावट धबधबा खरा बनविला होता.

दादासाहेबांच्या या चित्रपटातील आणखी एका चित्रचमत्कृतीचा उल्लेख केला पाहिजे ज्यात चित्रकलेचं यथार्थ दर्शन (परस्पेक्टिव्ह) घडतं. समुद्रावर तरंगणारे दगड त्यांनी पुठ्ठ्यांच्या मोल्डचे बनविले होते. तरंगताना ते खरोखरचे दगड आहेत असं वाटे. हे दृश्य विशिष्ट कोनातून घेतल्यानं वानरसेना समुद्रावरून क्षितीजापर्यंत जाते असं दिसतं. चित्रण वास्तव व्हावं म्हणून दादासाहेबांनी पुष्कळ चित्रीकरण रामेश्वरलाही केलं होतं.

'सेतुबंधन' पूर्ण व्हायला दोन वर्ष लागली तोवर इंपिरियल फिल्म कंपनीचा 'अलमआरा' हा भारतातील पहिला बोलपट १० मार्च १९३१ रोजी प्रदर्शित होऊन बोलपट युगाला भारतात प्रारंभ झाला. वर्षभरात प्रभात फिल्म कंपनीसारख्या अग्रेसर संस्थेचा 'अयोध्येचा राजा' हा मराठीतील पहिला बोलपट प्रदर्शित झाला. त्याची हिंदी आकृती आठवडाभर अगोदर प्रदर्शित झाली होती. हा बोलपट भारतभर सर्वत्र गाजू लागला.

आता मूकपटांना लोकाश्रय मिळणं अवघड आहे हे लक्षात घेऊन वामनराव आपटयांनी संस्था विसर्जित करण्याचा निर्णय घेतला. नोकर वर्गाचा पैन

पै पगार चुकता केला एवढंच नव्हे तर बोनस म्हणून प्रत्येकाला एक वर्षाचा पगार दिला व वामनराव आपटे चित्रपट व्यवसायातून मानानं निवृत्त झाले. त्यांच्यासारखा दिलदार संचालक विशेषत: चित्रपटसृष्टीत होणं विरळाच. 'सेतुबंधन' मूकपट असल्यानं त्याला थिएटर मिळणं कठीण झालं, कारण चित्रपटगृह बोलपटांनी काबीज केली होती. पुढं काय करायचं असा दादासाहेबांपुढं प्रश्न होता. हिंदुस्थान फिल्म कंपनी बंद झालेली. पण ती बंद होताना दादासाहेबांनीही इतर नोकरवर्गाप्रमाणं वामनराव आपट्यांनी दादासाहेबांनाही संपूर्ण पगाराबरोबर एक वर्षाचा बोनस दिला होता. इंपिरिअल फिल्म कंपनीच्या अर्देशीर इराणींची 'सेतुबंधन' ला आवाजाची जोड देण्याची कल्पना दादासाहेबांना पटली व त्यांनी ती अमलातही आणली. त्यासाठी ४० हजार रुपये खर्च आला. चित्रपट डब करणारेही पहिले दादासाहेब फाळकेच, पण 'सेतुबंधन' प्रदर्शित व्हायला १९३४ साल उजाडलं. म्हणजे तब्बल तीन वर्षं लागली. इतर बोलपटांच्या स्पर्धेत हा बोलपट टिकू शकला नाही आणि त्यामुळं दादासाहेब पुन्हा आर्थिक अडचणीत आले. आर्थिक संकट परंपरा चालूच होती.

यानंतर दादासाहेबांनी एनामलिंग व सिरॅमिक संबंधीचे काही प्रयोग केले. या प्रयोगाना औंध संस्थान व मुंबई येथील औद्योगिक प्रदर्शनात पारितोषिकंही मिळाली होती. दादासाहेबांची तैलबुद्धी सर्वगामी होती. 'सेतुबंधन' या मूकपटानं दक्षिणेत बराचसा खर्च भरून काढला होता. परंतु ध्वनीची जोड देण्यासाठी मध्यंतरी गेलेली दोन वर्षं आणि आवाजाची जोड देण्यासाठी झालेला खर्च 'सेतुबंधन' च्या अपयशानं अंगावर पडला.

## गंगावतरण

दादासाहेब फाळके यांच्यासारख्या जागतिक कीर्ति संपादन केलेल्या निर्माता दिग्दर्शकानं आपल्या कोल्हापूर सिनेटोनसाठी बोलपट निर्माण केला तर त्याचा दोघांनाही फायदा होईल या हेतूनं कोल्हापूर संस्थानचे अधिपती राजाराम महाराज यांनी दादासाहेबांना मानानं पाचारण केलं. परंतु पान खाऊन किंवा विडी-सिगारेट ओढत त्यांच्या समोर जायची कुणाची हिंमत होत नसे असा त्यांचा दरारा होता, असं वातावरण संस्थानी कारभारात राहणार नाही असं वाटल्यानं त्यांनी नकार कळवून टाकला.

पण कोल्हापूर महाराजांनी आग्रह सोडला नाही. शेवटी दादासाहेब कसेबसे

तयार झाले. उभयतांच्या बऱ्याच वाटाघाटी झाल्या. लेखनासाठी १५०० रु. दिग्दर्शनाबद्दल १० टक्के सनद व खर्चासाठी दरमहा ४५० रुपये देण्याचं ठरलं; पण हा करार लेखी झाला नसावा. हिंदुस्थान फिल्म कंपनीसाठी दादासाहेबांच्या मनात 'गंगावतरण' हा विषय घेण्याचं होतं. त्यांनी कथानकही लिहून ठेवलं होतं. तोच विषय कोल्हापूर सिनेटोनसाठी घेण्याचं ठरलं.

दादासाहेबांनी पटकथा-संवाद लेखनासाठी त्यांचे निकटवर्ती साहित्यिक ना. ह. आपटे यांचं सहाय्य घेतलं होतं. 'रंगभूमी' नाटकाप्रमाणं याचं संगीत दादासाहेबांचं होतं. जोडीला संगीततज्ज्ञ विश्वनाथबुवा जाधव होते. विशेष म्हणजे या चित्रपटाची गीतरचनाही दादासाहेबांची होती. या चित्रपटात एकूण १७ गाणी होती. कलामहर्षी बाबूराव पेंटर दादासाहेबांना सहकार्य करीत होते. 'गंगावतरण' मराठी व हिंदी दोन्ही भाषेत होता.

या चित्रपटातही चित्रचमत्कृतीची (ट्रिक फोटोग्राफी) रेलचेल होती. याचं बरचसं श्रेय दादासाहेबांचा ज्येष्ठ पुत्र भालचंद्र तथा बाबारायचं होतं. तो छायालेखनात तरबेज झाला होता. आकाशातून उडणारा घोडा, रांजणात अदृश्य होणारी भुतं, शंकरस्तवन करणारी दोन मुंडकी, गंगेचं स्वर्गातून पृथ्वीवर आगमन, आकाशात अधांतरी विहार करताना धबधब्याचं पाणी पिणारा माणूस, रांजणातून गाणं गात बाहेर पडणारी तीन चारशे माणसं, स्वर्गातून पृथ्वीवर आलेली गंगा शंकराच्या जटांभोवती वेटोळं घालते अशा तऱ्हेच्या चकीत करणाऱ्या दृश्यांनी चित्रपट भरगच्च होता.

दादासाहेबांचा उत्साह ६५-६६ व्या वर्षी तरुणासारखा होता. गिरसप्पाच्या धबधब्याचं चित्रीकरण करून दादासाहेब जवानाच्या तडफेनं कडा चढून सर्वांच्या पुढं गेले व कुठून व कसं चित्रण करायचं हे त्यांनी निश्चित केलं. त्यानुसार सायंकाळपर्यंत तिथं चित्रण करून डोंगराचा तो अवघड कडा भराभर खाली उतरले.

दादासाहेबांसारख्या प्रगल्भ बुद्धीच्या कितीतरी कला साध्य झालेल्या थोर तंत्रज्ञ कलावंतातही काही अवगुण होते. प्रत्येकच माणसात असतात तसे. या चित्रपटाच्या वेळीही त्यांच्यातील दूरदृष्टीचा अभाव दिसून आला. या दोषामुळं त्यांचं आयुष्यात मोठं नुकसान झालं.

त्यांना हिमालयावरील काही प्रसंगाचं चित्रण करायचं होतं. प्रत्यक्ष हिमालयावर जाणं शक्य नसल्यानं दादासाहेबांनी एक अव्यवहारी कल्पना काढली. कोल्हापूर जवळील रामलिंगचा डोंगर पाहून आले. बर्फाच्छादित हिमालयाचा परिणाम साधण्यासाठी त्यांनी कलाविभागाला चुनखडीनं संपूर्ण

डोंगर रंगविण्याचं फर्मान सोडलं. कलामहर्षी बाबूराव पेंटर व काही तंत्रज्ञानी हवातसा सेट लावून हे चित्रण स्टुडियोत करता येईल असा सल्ला दिला. पण मला मोठ्या प्रमाणात भव्यता हवी आहे म्हणून तो सल्ला नाकारला.

डोंगर रंगविण्याचं काम पंधरा दिवस चाललं होतं. सारा डोंगर रंगवून झाला. दुसरे दिवशी सकाळपासून तिथं चित्रीकरण करायचं ठरलं पण हाय! रात्री मुसळधार पाऊस पडला आणि सारा डोंगर धुवून निघाला. त्या ओल्याचिंब डोंगरावर पुन्हा लगेच रंग बसणं शक्य नसल्यानं शेवटी स्टुडियोतच सेट मांडून काम उरकावं लागलं. झालेला खर्च, वेळ सर्व वाया गेला.

या डोंगर रंगविण्याच्या प्रकरणी बरीच खडाजंगी झाली. कोल्हापूरचे महाराज फारच नाराज झाले. संस्थानी कारभारामुळं दादासाहेबांच्या कामात अकारण अडथळे येत. दादासाहेबांचं मन त्यामुळं विटलं. 'गंगावतरण' त्यांनी कसाबसा पूर्ण केला परंतु त्याचं प्रिंट तयार होण्यापूर्वीच ते नाशिकला परतले.

आपल्या कल्पनेतील हिमालय साकार करण्यासाठी त्यांनी केलेला सर्व खर्च वाया गेला याची खंत त्यांनी बाळगली नाही. आपल्या अचाट कल्पना प्रत्यक्षात उतरविण्यासाठी वाट्टेल तेवढा खर्च झाला तरी ते मनाला लावून घेत नसत. त्यामुळं अशक्य वाटणाऱ्या गोष्टी पुष्कळदा त्यांनी शक्य करून दाखविल्या. कितीतरी चमत्कार चित्रपटसृष्टी बाल्यावस्थेत असल्यानं तांत्रिक यांत्रिक सुविधा उपलब्ध नसताना त्यांनी प्रेक्षकांना दाखविले. त्यांच्या अचाट कल्पना शक्तीचं साऱ्यानाच कौतुक होतं.

'गंगावतरण' पूर्ण व्हायला दोन वर्ष लागली. अडीच लाख रुपये खर्च झाले. ६ ऑगस्ट १९३७ रोजी हा बोलपट मुंबईच्या रॉयल ऑपेरा हाऊसला प्रदर्शित झाला होता. तिथं प्रदर्शित झालेला हाच पहिला भारतीय चित्रपट. संस्थानशी संबंध बिघडल्यामुळं दादासाहेबांची ठरलेली पूर्ण रक्कम त्यांना मिळाली नाही.

चित्रपट प्रदर्शित झाला तेव्हा दादासाहेब रॉयल ऑपेरा हाऊस वरून चालले होते. थिएटरचं आवार तुडुंब भरलं होतं. पण दादासाहेबांचा खिसा रिकामा होता. 'गंगावतरण' प्रदर्शित झाल्यावर सर रहेमत्तुल्ला दादासाहेबांना भेटले. चित्रपट निर्मितीसाठी हवा तेवढा पैसा खर्च करायला ते तयार होते पण वैतागलेल्या दादासाहेबांनी प्रकृतीचे कारण पुढं करून सर रहेमतुल्लांना त्यांनी नम्र नकार कळविला. भारतीय चित्रपटसृष्टीच्या जनकाला पाठोपाठच्या आघातानं काही करू नये असं वाटू लागलं असावं.

☆

# भारतीय चित्रपटसृष्टीच्या जनकाचे अखेरचे दिवस!

'गंगावतरण' हा दादासाहेबांनी दिग्दर्शित केलेला एकमेव बोलपट, बाकी ५२ मूकपट होते. अनुबोधपटाबरोबर त्यांनी ३० लघुपटही काढले होते. त्याचे जनकही तेच होते. दादासाहेबांचं या चित्रपटानंतर चित्त थाऱ्यावर नव्हतं. मन:स्वास्थ्यासाठी ते कोरेगावाला ह. ना आपटे या साहित्यिक स्नेह्याकडं जवळजवळ वर्षभर राहिले. प्रभात फिल्म कंपनीनं अनुबोधपट, माहितीपट, शैक्षणिकपट लघुपट निर्माण करावे व तो विभाग दादासाहेबांनी सांभाळावा अशा वाटाघाटी चालल्या होत्या. दादासाहेबांना दरमहा अडीचशे रुपये मानधन सुरूही झालं होतं. पण ही योजना पुढं प्रत्यक्षात उतरू शकली नाही.

१९१३ सालच्या मे महिन्यात दादासाहेब फाळके दिग्दर्शित 'राजा हरिश्चंद्र' प्रदर्शित होऊन पंचवीस वर्ष होऊन गेली होती म्हणून १९३९ सालच्या मे महिन्यात मुंबईला भारतीय चित्रपटसृष्टीचा रौप्यमहोत्सव करायचं निश्चित झालं होतं. प्रमुख पाहुणे अर्थातच दादासाहेब फाळके होते. माझे मेहुणे प्रभात फिल्म कंपनीचे एक भाग्यविधाते विष्णुपंत दामले मला व माझा थोरला भाचा या दोघांना या समारंभाला घेऊन गेले होते. प्रत्येक संस्थेनं आपल्या कल्पनेनुसार सजावट करून स्टॉल उभा केला होता. त्यात उठून दिसत होता. प्रभातचा देखणा कलात्मक स्टॉल व रणजित मुव्हिटोनचा बोधचिन्ह घोडा बऱ्याच उंचावर उभा केला होता.

विष्णुपंत दामल्यांनी आम्हाला दादासाहेब फाळक्यांचं प्रत्यक्ष दर्शन घडविलं आणि सांगितलं, 'हे दादासाहेब फाळके यांनी सिनेमाचा आपला धंदा आपल्या देशात सुरू केला बरं का?' तेव्हा कुठं आम्हा शाळकरी मुलांना कळत होतं की हा केवढा मोठा, असामान्य माणूस आहे. मी पूर्वीच्या पद्धतीनं त्यांना वाकून नमस्कार केला, त्यांनी माझ्या पाठीवरून हात फिरविला. भारतीय चित्रपटसृष्टीच्या जनकाचा हात आपल्या पाठीवरून फिरला हे कळण्याची

जाण तेव्हा चौदा-पंधरा वर्षाचा मुलाला कुठली आलीय? आता त्याचं अप्रूप वाटतं.

दुर्दैवानं दादासाहेबांचा योग्य तो मान संयोजकांकडून ठेवला गेला नाही. याचं कारण त्यावेळी तेव्हा कुणी नव्हते. त्यांच्या स्वागतालाही प्रवेशद्वारावर कुणी नव्हतं म्हणून ते प्रेक्षकात जाऊन बसले. हे लक्षात आणून दिल्यावर पृथ्वीराज कपूर त्यांना हाताला धरून मानानं व्यासपीठीवर घेऊन गेले. त्यांचं आसन कोपऱ्यात ठेवलं होतं. त्यांच्या गौरवाची जोरदार भाषणं झाली, त्यानंतर पृथ्वीराज कपूर उभे राहिले व प्रेक्षकांना उद्देशून म्हणाले, 'इतका वेळ ज्यांची स्तुती आपण ऐकता आहात ते भारतीय चित्रपटसृष्टीचे जनक ते पहा ,तिकडं कोपऱ्यात बसले आहेत.' तेव्हा टाळ्यांचा कडकडाट झाला. दादासाहेब धोतर, कोट, सदरा, टोपी अशा साध्या वेशात खाली मान घालून बसले होते. ते बोलायला उभे राहिले तेव्हा पुन्हा टाळ्यांचा गजर झाला, पण अपमानास्पद वागणुकीमुळं ते 'माझ्या प्रिय बाळांनो' यापेक्षा अधिक काही बोलू शकले नाहीत. त्यांचं भाषण अभिनेते गजानन जागिरदारांनी वाचून दाखविलं.

भारतीय रौप्य महोत्सवानिमित्त फाळके पर्स फंड कमिटी स्थापन करण्यात आली होती. या कमिटीनं त्या दिवशी दादासाहेबांना एक थैली अर्पण केली होती. त्यात ६२५० रुपये ७ आणे जमले होते. त्यात प्रभात फिल्म कंपनीचे १२०० रुपये, न्यू थिएटर्स व रणजित प्रत्येकी ५०० रुपये बाकीच्या संस्थांनी नाममात्र हातभार लावलेला दिसतो.

त्यावर्षी १९३९च्या डिसेंबर महिन्यात दादासाहेबांनी भारतीय चित्रपट निर्मात्यांना उद्देशून मुंबई आकाशवाणीवरून चित्रपट कसा असावा व कसा नसावा या विषयावर भाषण केले. त्यांनी निर्मात्यांना त्यांच्या जबाबदारीची जाणीव करून दिली.

'गंगावतरण' चित्रपटाच्यावेळी दादासाहेब म्हणत हा माझा शेवटचा चित्रपट. आता बस झालं. माझी अशी इच्छा आहे की 'माझ्या चित्रपटाचं उगीचच कौतुक करू नका, माझ्या चित्रपटावर परखड पण रास्त टीकाही व्हावी म्हणजे इतर चित्रपट निर्माते दिग्दर्शकांना त्यात सुजाणपणे दाखविलेले दोष, चुका मार्गदर्शन ठरतील.' दादासाहेबांच्या मनाचा हा मोठेपणाच होता.

'गंगावतरण' हा दादासाहेबांचा खरोखरच अखेरचा चित्रपट ठरला. मिळालेल्या थैलीतील रकमेतून दादासाहेबांनी घरी इटालियन स्पिगेटी, साबण तयार करणे, हायपोपासून चांदी तयार करणे हे गृहउद्योग सुरू केले. त्यातही

ते यशस्वी झाले; पण दादासाहेबांचा बेहिशेबी कारभार इथंही नडला. फायद्यापेक्षा खर्चच अधिक झाला आणि थैलीत मिळालेल्या पैश्यातील निम्मं धन या कामी खर्ची पडलं.

दादासाहेबांना अखेरच्या काळात हक्काची सावली असावी म्हणून दादासाहेबांनी पुत्रवत प्रेम केलेले नाशिकचे माधवराव शुक्ल यांनी पुढाकार घेऊन उरलेल्या रकमेतून छोटेखानी बंगली १९४२ साली उभी राहिली. त्याचं नामाभिमान 'हिंद सिने जनका श्रम' असं स्वत: दादासाहेबांनी केलं. स्वत:च्या वास्तूत राहायला गेल्यावर दादासाहेबांनी बांधकामात इतका खर्च केला व सुमारे साठ वर्षांपूर्वी दोन अडीच हजार रुपये कर्ज डोक्यावर बसलं. याचा अर्थ एकच, कर्ज व आर्थिक विवंचनेनं दादासाहेबांची पाठ कधीच सोडली नाही. चित्रं काढून ती विकण्याचा प्रयत्न त्यांनी केला; पण त्यात फारसं यश आलं नाही. स्वत:च्या घरी राहायला गेल्यावर दादासाहेबांना मधुमेहाचा विकार जडला. हातात काही काम नव्हतं. आपल्या कल्पनेनं काहीतरी लिहित बसायचे. पुढं आपल्या कथा घेऊन या स्टुडिओतून त्या स्टुडिओत ह्या दाखवायला त्यांनी हेलपाटे घालायला सुरुवात केली. असेच प्रभात स्टुडिओत आले आणि विष्णुपंत दामल्यांना भेटले. त्यांना काही कथा दाखविल्या. त्यातली 'जपानी पंखा' दामल्यांनी घेतली व मानधन म्हणून त्या काळात दोन हजार रुपये दिले. तेव्हा दादासाहेब मोठ्या आर्थिक विवंचनेत होते.

प्रभातचे प्रमुख सहाय्यक दिग्दर्शक राजा नेने यांनी ती वाचून पाहिली. आपल्या मामांना विष्णुपंत दामल्यांना त्यांनी आपलं मत सांगितलं. 'आपल्याला ही कथा उपयोगी पडेल असं वाटत नाही.' दामल्यांनी उत्तर दिलं, तो विचार मी केलाच नाही. आज आपण जे उभे आहोत ते त्यांच्या जिवावर. सध्या ते आर्थिक अडचणीत आहेत. त्यांना काहीतरी मदत यावेळी करणं आपलं कर्तव्य आहे. तशीच दिली तर ते घेणार नाहीत. ते मानी आहेत म्हणून मी हा पर्याय काढला आहे. मी 'रामशास्त्री' पासून प्रभातमध्ये प्रमुख सहाय्य दिग्दर्शक म्हणून रुजू झाल्यावर जपानी पंखाची फाईल पाहिली होती.

१९४३ साली मद्रासच्या 'फिल्मन्यूज' या सिनेसाप्ताहिकाला प्रदीर्घ मुलाखत दिली होती तो दुसऱ्या महायुद्धाचा काळ होता. चित्रपटसृष्टीला विशेषत: हिंदीला वेडवाकडं वळण लागायला सुरूवात झाली होती. त्याचा संदर्भ घेऊन दादासाहेबांनी म्हटलं होतं, 'मी भारतीय चित्रपटसृष्टीच्या निर्मितीबद्दल फार निराश झालो आहे. कोणत्या उद्देशानं दीर्घकाळ हालअपेष्टा सोसून

हा स्वदेशी व्यवसाय मी उभा केला आणि आज मी काय पाहतोय?'

'सिनेमा ही कामधेनू आहे. परंतु या कामधेनूला शास्त्र, कला, नीती, देशभक्ती, स्वदेश प्रेम आदीचा चारा न मिळता नको तो चारा मिळतो आहे. माझ्या माहितीप्रमाणं बरेचसे फिल्म स्टुडिओ आता सभ्य गृहस्थानी पाऊल टाकण्यासारखे राहिले नाहीत. चित्रपटाचं तंत्र सुधारलं आहे. पण चित्रपटांची लांबी फार असते, गाणी, संवाद आणि चावट विनोदांचा भरणाच फार. गाण्यासाठी गाणी धुसडायची हे अगदी गैर आहे.' सुमारे साठ वर्षांपूर्वी दादासाहेबांनी हे सांगितलं होते.

'मुव्हिंग पिक्चर्स' या सिनेनियतकालिकाने दादासाहेबांच्या 'लंकादहन'नं क्रांती केली होती (१९१७) त्याबद्दल या नियतकालिकाने त्यांच्याबद्दल अत्यंत गौरवास्पद लिहिलं होतं, त्याच सिनेनियतकालिकान दादासाहेबांना नम्रपणे पत्र लिहून विनंती केली होती की, आपली माहिती व जास्त जास्त छायाचित्र पाठवून आम्हाला उपकृत करावं. आम्हाला आपल्यावर खास अंक काढावयाचा आहे.

दादासाहेबांचा मधुमेह बळावत चालला होता व त्यातच त्यांना नैराश्य, वैफल्य यांनी ग्रासलं होतं. त्यांनी संपादकांना कळवून टाकलं, 'माझं अपत्य मला पूर्णपणे विसरलं आहे. मी त्याला स्मरण देऊ काय की मी तुझा जनक आहे, मला आता या क्षेत्राबद्दल, माझ्या प्रसिद्धीबद्दल आजिबात रस उरला नाही. कृपया, माझ्यासाठी कुणीही, काहीही करू नये, माझ्यावर अंक काढण्याची कल्पना मनातून काढून टाका. आता मला काहीही अपेक्षा, उत्साह, उमेद राहिली नाही. मी आता आहे तसाच मला राहू द्या. कशाला मला प्रकाशात आणण्याचा प्रयत्न करता? माझ्याबद्दल आता कुणाला प्रेम, आदर, कुतुहल उरलं आहे? अकारण असा अंक वाचकांच्या माथी मारण्यात काय अर्थ आहे? आपल्याला माझी आठवण झाली याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे. पण या कामी मी आपल्याला काहीही सहकार्य करू शकत नाही याबद्दल मला क्षमा करा, कृपया रागवा, गैरसमज करून घेऊ नये ही विनंती.' ही घटना १९४३च्या अखेरची.

दादासाहेबांना स्मृतीभ्रंश झाला होता. त्यांना बालपणीच्या आठवणी अचूक आठवत. बालपणीच्या मित्रांच्या आठवणी यायच्या. काही गेलेल्या मित्रांशी तो समोर बसला आहे अशा भावनेनं काल्पनिक संवाद करीत. परंतु दुर्दैवानं आपल्या अफाट कर्तत्वाचा काळ विसरले होते. त्याबद्दल बोलताना त्यात सुसंगती राहात नव्हती. त्यांचे जामात डॉ. आठवले माईचे (मंदाकिनी) पती

नाशिकलाच असल्याचा त्यांची जास्तीतजास्त काळजी घेत होते. त्यामुळं हळूहळू हा विकार पुष्कळ कमी झाला होता.

एके दिवशी दादासाहेबांचे एक चिरंजीव प्रभाकर दादासाहेबांना म्हणाले, 'दादा, तुम्ही आगकाड्यांची मौज, लक्ष्मीचा गालीचा यासारख्या ॲनिमेटेड फिल्म्स घेतल्या आहेत, आपल्या घरी पॅथेचा कॅमेरा पडला आहे. आपण कार्टून पिल्म्स काढू, मी सगळे परिश्रम करीन, फक्त तुम्ही माझ्या पाठीशी असा म्हणजे झालं.'

दादासाहेबांना पुन्हा एकदम उभारी आली की आपण एखादा चित्रपट काढावा व ज्यात भारतीय संस्कृतीचं खरंखुरं दर्शन घडेल असा विषय घ्यावा आणि भारतीयांना दाखवून द्यावं- 'अरे ही आपली खरी संस्कृती आहे, आजच्या चित्रपटात तुम्ही बघता ती नव्हे.'

याचा अर्थ दादासाहेब उदास झाले असले तरी संपूर्ण निवृत्त झाले नव्हते. तो दुसऱ्या महायुद्धाचा काळ होता. फिल्मचा तुटवडा होता. चित्रपट निर्मितीसाठी सरकारी परवाना लागतच असे. अर्ज केल्यास जर तो चित्रपट निर्माता असेल त्याला तो परवाना मिळत असे. दादासाहेबांनी तसा अर्ज २६ जानेवारी, १९४४ रोजी परवान्यासाठी दिल्लीस सरकारी कार्यालयाकडं पाठवून दिला. वास्तविक दादासाहेबांना परवाना मिळण्यात काहीच अडचण नव्हती. इतके चित्रपट त्यांनी दिग्दर्शित व निर्माण केले होते. चित्रपटसृष्टीचे जनकच ते.

परवान्यासाठी दादासाहेब डोळ्यात प्राण आणून वाट बघत होते. एकदाचा परवाना आला की पुढच्या तयारीला तातडीनं लागण्याची त्यांची योजना होती; पण हाय! १४ फेब्रुवारी रोजी दादासाहेबांना 'तुम्हा परवाना देता येणार नाही' असं नकारात्मक पत्र आलं. या धक्क्यानं दादासाहेबांचं अवसान गळालं. दुर्दैवानं शेवटचापण प्राणघातक प्रहार केला. 'मी पंचवीस वर्षं झटून झगडून भारतीय चित्रपट कला वैभवाप्रत नेली. कुटुंबियांचे हाल केले. आर्थिक विवंचनेनं विकार ओढवून घेतले. वाट चुकलेल्या वासरासारखी माझी अवस्था झाली आहे. हेच फळ काय ममतपाला? निर्धनाला काडीची किंमत नाही हे पुन्हा एकदा मला कळून चुकलं.' असे दुःखोद्गार कळवळून त्यांनी काढले.

दादासाहेबांनी अर्ज पाठविल्यावर भालचंद्र तथा बाबाराय व्ही. शांताराम यांना भेटले होते. त्यावेळी चित्रपट निर्मिती संघटनेचे ते अध्यक्ष होते. त्यांना दिल्ली दरबारी शब्द खर्च करण्याची विनंती केली होती. वास्तविक त्याची

खरी आवश्यकता नव्हती. भारतीय चित्रपटसृष्टीचे जनक म्हणून दादासाहेब इराणचा दौरा काही दिवसापूर्वीच करून आले होते. ते वृत्त प्रसिद्धही झाले होते. पण व्ही. शांतारामनी याबाबत मी काही करू शकत नाही म्हणून सांगितलं.

भालचंद्राला हा राग येण्यापेक्षा फार वाईट वाटलं. कारण चित्रपटसृष्टीचा काडीचा संबंध नसलेले कागद, लोखंड, हिंग, फार काय शेवगाठीचे व्यापारीही दिल्लीच्या कसोटीला (?) उतरून निर्माते बनत होते. खरं सांगायचे तर पहिला हक्क दादासाहेबांचाच होता. पण त्यांना मात्र नकार आला होता. हा अजब न्याय होता.

दादासाहेबांनी सतत यातना भोगल्या, हाल सोसले पण ते कधी खचले नव्हते. हिंमत हारले नव्हते. दरवेळी खंबीरपणे पुनःपुन्हा उभे राहात होते, नव्या अडचणी, संकटांना सामोरे जात होत, पण हा वर्मी बसलेला घाव मात्र त्यांना सोसवला नाही. सरकारी नकारात्मक उत्तराची शाई वाळते न वाळते तो फक्त एकच दिवस मधे गेला आणि १६ फेब्रुवारी १९४४ रोजी वयाच्या ७४ व्या वर्षी विपन्नावस्थेत भारतीय चित्रपटसृष्टीच्या जनकाची तळमळून तडफडून प्राणज्योत मालवली. स्वप्नांशी चाललेला एक खेळ, जीवनाशी चालेलली एक झुंज संपली!

चित्रपटसृष्टीनं दादासाहेबांच्या निधनाची फारशी नोंद घेतली नाही. त्यांच्या घराजवळचं सिनेमागृह देखील त्या दिवशी चालू होतं. वृत्तपत्रांनीही ठळकपणे त्यांच्या मृत्यूच्या वृत्ताला महत्त्व दिलं नव्हतं. या महापुरुषाच्या अंत्ययात्रेला मोजकीच माणसं होती. संतज्ञानेश्वरांच्या भाषेत 'माझ्या बाहे म्या व्योम कवळिले' असा स्वदेशी चित्रपटसृष्टीच्या उभारणीच्या अतुलनीय पराक्रम केला, अशक्य वाटणारं ज्यांनी शक्य करून दाखविलं त्या असामान्य तंत्रज्ञ कलावंताची अतिसामान्यासारखी अंत्ययात्रा निघाली.

दादासाहेबांची प्रगल्भबुद्धी, संशोधक वृत्ती, निकोप निरोगी प्रकृती, कल्पकता, कलात्मकता, ज्या क्षेत्रात, कलात लक्ष घालतील त्यात प्राविण्य संपादन करण्याची क्षमता आदी गुण समुच्च या बरोबर दुर्दैवाची साथही बरोबर घेऊन जन्माला आले होते. दादासाहेबांच्या मृत्यूनंतरही दुर्दैवानं त्यांची पाठ सोडली नव्हती. दादासाहेबांच्या स्वर्गावासानंतर काकींनी त्यांच्या विवाहापासून दादासाहेबांच्या अखेरपर्यंतच्या संगतवार आठवणी सुनेला सांगून लिहून घेतल्या होत्या. काकीनंतर अर्धांगानं अंथरुणावरच होत्या. अतिशय सुबुद्ध काकीची (सरस्वतीबाई) स्मरणशक्ती पूर्णतः जागृत होती. काही आठवणी

वृत्तपत्रं, नियतकालिकांत प्रसिद्धही झाल्या होत्या. त्या अतिशय हृदयंगम उतरल्या होत्या.

दादासाहेबांची द्वितीय कन्या मालती दादासाहेबांच्या कैलासवासानंतर तीन महिन्यांनी एका निवृत्त सरकारी अधिकारी श्री. पुसाळकर यांच्या श्रीकृष्णाला सांगून गेली होती. परिचय नसतानाही पुसाळकरांची दादासाहेबांच्यावर श्रद्धा होती. ते आनंदातिशयानं म्हणाले होते, 'म्हणजे मालतीच्या रुपानं दादासाहेबाच आमच्या घरी येत आहेत, असं मी मानतो'. आणि हा विवाह संपन्न झाला होता.

या पुसाळकरांनी दादासाहेबांच्याबद्दल जे जे प्रसिद्ध झालं होतं त्याची कात्रणाची एक फाईल केली होती. ती त्यांनी काकींच्या स्वाधीन केली होती. एके दिवशी कुलकर्णी नावाचे एका नियतकालिकाचे संपादक काकींच्याकडे आले व काकींना त्यांनी विनंती केली, 'हे सगळं घरात ठेऊन तुम्ही काय करणार आहात? हे सारं फार मोलाचं आहे. हा भारतीय चित्रपटसृष्टीच्या इतिहासातील अत्यंत महत्त्वाचा भाग आहे. मी हे पुस्तक स्वरुपात प्रसिद्ध करतो म्हणजे ते कायम स्वरुपात राहील आणि राहिलं पाहिजे. अभ्यासक, संशोधक यांना अत्यंत उपयुक्त मार्गदर्शक ठरेल.'

काकींनाही ते पटलं आणि ते मौल्यवान लेखन कुलकर्ण्यांच्या स्वाधीन केल। पण दुर्दैवानं त्याचं पुस्तकही निघालं नाही. पुसाळकरांची त्यांनी दिलेली कात्रणंही आता दीर्घकाळ लोटला तरी परत आली नाहीत. आता ते नष्ट झालं असावं. एक मौलिक इतिहास अशा तऱ्हेनं नाहीसा झालेला दिसतो.

एक काळ गाजविलेल्या प्रतिष्ठित व ज्येष्ठ अभिनेत्री दुर्गा खोटे यांनीही दादासाहेबांच्या विषयीचं बरच साहित्य जमा केलेलं होतं. ते माझ्या स्वाधीन करण्याची त्यांची मनापासून इच्छा होती. 'आमचा प्रभात फिल्म कंपनीपासूनच परिचय' त्याचं तसं पत्रही माझ्या संग्रही आहे. पण ते साहित्य आता कुठं सापडत नाही. दुर्गाबाई गेल्यानं आता ते मिळण्याची शक्यता दुरावली आहे. हे सर्व उपलब्ध असतं तर भारतीय चित्रपटसृष्टीचा प्रारंभीच्या काळातील केवढातरी अधिकृत इतिहास हाती आला असता. पण इथंही दादासाहेबांचं व आपलं दुर्दैव आड आलं.

दादासाहेब मृत्यूनंतरही दुर्लक्षित राहिले. मुंबईला दादरला ज्या मथुरादास भवनात दादासाहेबांनी पहिला भारतीय चित्रपट निर्माण केला त्या रस्त्याला दादासाहेब फाळक्याचं नाव देण्यात आलं आहे. एक रस्त्याच्या कोपऱ्यावर दादासाहेबांचा एक छोटासा ब्रांझचा अर्धपुतळा चित्रपटसृष्टीनं बसविलाय.

दादासाहेब मृत्यूनंतरही दुर्लक्षित राहिले हे सत्य आहे तरी उशीरा का होईना भारत सरकारनं त्यांच्या महान कार्याची योग्य ती कदर केली. त्याबद्दलचा आदर कृतीनच व्यक्त केला. त्यांची निरंतर स्मृती राहावी म्हणून दादासाहेबांच्या जन्मशताब्दीपासून म्हणजे १९७० सालापासून भारत सरकारनं चित्रपटसृष्टीत ज्यांची प्रदीर्घ व लक्षणीय कामगिरी आहे अशा एकाला समारंभपूर्वक प्रतीवर्षी 'दादासाहेब फाळके पुरस्कार' दिला जातो.

आता या पुरस्काराचं मानधन देण्यात येतं. राजकपूरच्या अखेरच्या दिवसात हा पुरस्कार जाहीर झाला होता. पुरस्कार सोहळ्याला उपस्थित राहण्यासारखी त्याची प्रकृती नसूनही तो मोठ्या उत्साहानं उपस्थित राहिला होता व सद्गतीत होऊन त्यानं आपल्या भावना व्यक्त केल्या होत्या. 'दादासाहेब फाळके हा चित्रपटसृष्टीत सर्वोच्च बहुमान मला मिळाला. आता मला मिळवायचं काही राहिलं नाही.' दादासाहेबांच्या जन्मशताब्दीनिमित्त खास तिकीट काढण्यात आलं होतं. त्यांच्या सहकाऱ्यांचा सत्कारही करण्यात आला होता.

☆

# उपसंहार

सरस्वतीबाई (काकी) : प्रत्येक कर्तृत्ववान पुरुषाच्या मागं एक स्त्री असते असं म्हटलं जातं. दादासाहेबांच्या बाबतीत तर ते सत्यच आहे. महापुरुष हा परमेश्वराची कीर्ति असतो तर महासती ही परमेश्वराची मूर्ती असते. सरस्वतीबाई होत्या म्हणून दादासाहेबांसारख्या कलंदर कलावंताचा संसार होऊ शकला. येणाऱ्या आपत्तीशी त्यांना सतत झगडावं लागलं. कधीही तक्रार, त्रागा न करता.

त्या होत्या म्हणून मुलाबाळांचे यथायोग्य संगोपन होऊ शकलं. त्या साध्वी गृहस्वामिनीच्या सोशिकपणाला तोडच नाही. दादासाहेबांनी संसाराची कधीच काळजी केली नाही. संसारात सतत उभा वारा, दादासाहेबांचा स्वभाव अत्यंत तापट, एक कल्ली, हट्टी, त्यांची मर्जी त्या नेहमी सांभाळीत. त्यांना त्यांनी कधीही दुखावलं नाही. उपासमार सहन करावी लागली तरी कधीही ब्र काढला नाही.

चित्रपट व्यवसाय स्वदेशी व्हावा या वेडापायी दादासाहेबांना टीकेला सतत सामोरं जाव लागलं. चाळीशी उलटलेली, निर्धन अवस्था, कुणाचाही आधार नाही. स्वदेशी चळवळीला नेत्यांनीही नाउमेद केलं. नातेवाईक, हितचिंतक त्यांना नेहमीच मूर्खात काढीत. कुणी तोंडावर बोलत, कुणी माघारी टिंगल करीत, धीर दिला तो फक्त सरस्वतीबाईनी! दादासाहेब आर्थिक विवंचनेत आहेत हे लक्षात येताच त्यांनी न मागता आपले अलंकार त्यांच्यापुढं ठेवले. पतीचं ध्येय हेच आपलं व्रत त्यांनी सदैव मानलं होतं.

प्रारंभी तर पन्नास-पाऊणशे मंडळी दादासाहेबांच्या कंपनीच्या बंगल्यातच निवासाला होती. त्यांच्या दोन्ही वेळच्या भोजनाची व्यवस्थित सोय करणं ही उरसफोड दररोज न कुरकुरता काकी हसतमुखानं करीत. त्यात कुणाच्या आवडी निवडी, एकादश्या, चतुर्थ्या, अन्य उपवास हे लक्षात ठेऊन काकी त्यांच्यासाठी वेगळे पदार्थ करीत. कुणाचं दुखणं-खुपणं उपटलं तर काकी रुग्णाची वैयक्तिक काळजी घेत.

काहींचे संसार त्यांनी आत्मियतेनं थाटून दिले. स्त्री वर्गाची डोहाळे जेवणं, एखादवेळी बाळंतपणही त्यांनी पार पाडली होती. दुसऱ्याचे संसार उभारताना स्वत:चा संसार मात्र त्यांना यशस्वीपणे उभारता आला नाही.

पदरात ९ अपत्य. दरवाज्यात आलेली लक्ष्मी पुन: पुन्हा परत गेल्यानं, दारिद्र्याचं घरात नेहमीच वास्तव्य, सरस्वतीबाईनी स्वत:ची कधीच काळजी केली नाही. परंतु मुलांची, त्यांच्या शिक्षणाची, त्यांच्या भविष्याची चिंता त्यांना आयुष्यभर भेडसावीत होती. दादासाहेबांच्या माघारी काकी (सरस्वतीबाई) अर्धांगानं अंथरुणाला खिळल्या. मुलं हळूहळू मार्गाला लागली. जन्मभर त्यांना काळज्यांनी ग्रासलं तरी त्यांची सोशिकवृत्ती वाखणण्याजोगी होती. विनोदबुद्धी जागृत होती. थोडक्यात सरस्वतीबाई आदर्श पत्नी, माता तर होत्याच तशाच त्या अनेकांचं श्रद्धास्थानही होत्या. अशा या वात्सल्याची मूर्ती देवता स्वरुप काकी (सरस्वतीबाई) १ जून १९५३ रोजी स्वर्गावासी झाल्या! त्या सुटल्या!! मुक्त झाल्या!!! धन्य ती माऊली! पण त्यांचा अपूर्व त्याग, कर्तबगारी, हुशारी अज्ञातच राहिली.

## धुंडिराज गोविंद तथा दादासाहेब फाळके

कलावंत म्हणून दादासाहेबांनी केवढी तरी कीर्ति मिळविली. पण पती किंवा पिता म्हणून ते कौटुंबिक जीवनात अयशस्वी ठरले याचा अर्थ त्यांचं आपल्या कुटुंबियांवर प्रेम, जिव्हाळा नव्हता असा नाही. त्यांना सदैव चिंता विचार होता तो आपल्या चित्रसंसाराचा. त्यातच ते बुडून गेलेले असत. मुलांनी शिस्तीत वागलं पाहिजे यावर त्यांचा कटाक्ष होता. त्यांच्यावर योग्य संस्कार व्हावेत म्हणून त्यांनी घरात एक छोटसं ग्रंथसंग्रहालयही ठेवलं होतं. त्यासाठी त्यांनी 'आनंद' 'बालोद्यान' ही मुलांची मासिकं चालू केली होती. मुलांनी वाचावी अशी 'बाल भागवत' 'रामायण' 'महाभारत' यासारखी पुस्तकही त्यात होती.

दादासाहेब तीन वेळा परदेशात जाऊन आले. मद्य तर सोडाच; पण कधी सिगारेटही त्यांनी कधी ओढली नाही. सुपारीच्या खांडाचही व्यसन त्यांना नव्हतं. त्यांच्या कलागुणाचं दर्शन वेळोवेळी घडतं; त्याचबरोबर चित्रपट स्वदेशी व्हावा यासाठी त्यांना सोसाव्या लागलेल्या हालअपेष्टा, आर्थिक विवंचना यांना सीमाच नव्हती. हेही लक्षात येतं. दृष्ट लागण्यासारखं लौकिक यश मिळूनही आर्थिक यशाला दादासाहेब कायमचे पारखेच राहिले म्हणून या

महान कलावंताच्या जीवनाची शोकांतिका झाली!

आपलं स्वदेशी व्यवसायाचं ध्येय हेच जीवन मानणाऱ्या दादासाहेब फाळक्यांप्रमाणं सर्वस्व वाहिलेल्या कितीतरी थोर कलावंतांच्या नशिबी हेच भोग आले आहेत. पण त्यांना त्याबद्दल ना कधी खेद वाटला ना खंत. त्यांच्या पश्चात ते कीर्तिरूप उरले पण प्रतिकूल परिस्थितीचे चटके त्यांना सोसावेच लागले त्याचं काय? दादासाहेबांच्याबरोबर त्यांच्या कुटुंबियांना दुर्दैवाचे दशावतार बघावे लागले.

निःस्पृह, निरीच्छ, तत्त्वनिष्ठा, तळमळीचे, ऐहिक सुखाबद्दल अनासक्ती असणारे, राष्ट्रभक्त, समाजसुधारक, तसेच कलावंत, यांच्या जीवन इतिहासात तर यापेक्षा वेगळं काय दिसतं? दादासाहेबांनी व्यवहार चातुर्य दाखविलं असतं, थोडा समजूतदारपणा दाखविला असता, तापट स्वभावाला जरा मुरड घातली असती तर याहूनही केवढं तरी कार्य झालं असतं. ते स्वतः आणि कुटुंबिय यांना किमान स्वास्थ लाभलं असतं.

दादासाहेबांचे दोष जमेस धरून देखील त्यांना चित्रपट व्यवसाय स्वदेशी व्हावा म्हणून उतारवयात, निष्कांचन अवस्थेत जे महत्कार्य केलं त्याचं मूल्यमापन होणार नाही. आज भारतीय चित्रपटसृष्टीचा कुतुबमिनार दिमाखात उभा आहे, हजारोचं हे कमाईचं साधन आहे. गेली तीस वर्षाहून अधिक काळ भारताचा संख्येनं पहिला क्रमांक आहे. १। कोट प्रेक्षक भारतात चित्रपट पाहतात. भारतात ८७० हून अधिक सिनेसाप्ताहिक या धंद्यावर निघतात. १०८ देशात भारतीय चित्रपट दाखविले जातात, कित्येक कोटीचं परदेशी चलन या व्यवसायातून भारताला मिळतं.

चित्रपटसृष्टीनं दादासाहेबांचं सदैव ऋणी राहिलं पाहिजे. चोहोबाजूनी संकटं, अडचणी, समस्या, अवहेलना, उपहास, उपेक्षा सदैव यांनी घेरलं असताना दादासाहेब आपल्या अंगीकृत कार्यापासून तिळमात्र ढळले नाहीत, कधी हिम्मत हारले नाहीत. खचले नाहीत. प्रसिद्धीचा हव्यास त्यांना कधीच नव्हता. आपला ध्येय, ध्यास हेच सर्वस्व मानलं होतं.

दादासाहेब फाळक्यांच्या भारतीय चित्रपटसृष्टी उभारण्याच्या अजोड, अलौकिक कार्याची तुलना फ्रान्सचे ल्युमिए बंधू, जॉर्ज़ मेलिए, रशियाचे स्यिर्ग्येई आयसेस्तिन, पुदाव्हकिन, जर्मनीचा जॉर्न वॅनगऱ्, अर्न्स्ट लुबिश, रॉबर्ट व्हिन, ब्रिटनचे डेव्हिड लिन, झुकेर, अमेरिकेचे एडविन पोर्टर, डेव्हिड ग्रिफिथ या जागतिक चित्रपटसृष्टीतील युगपुरुषांच्या मालिकेत भारतीय चित्रपटसृष्टीचे जनक दादासाहेब फाळक्यांना स्थान दिलं गेलं. एवढी जागतिक

मानमान्यता पावलेल्या भारतीय चित्रपटसृष्टीच्या जनकाबद्दल हेच म्हणावसं वाटतं 'दिव्यत्वाची जेथे प्रचीती । तेथे कर माझे जुळती । नाशिकला आता त्यांचं भव्य स्मारक उभं राहिलं आहे.

☆



बापू वाटवे

जन्म : १५ जून १९२४. राधानगरी (जि. कोल्हापूर). वडील कोल्हापूर संस्थानात वन अधिकारी. वर्षाचा असताना आईच्या माघारी ज्येष्ठ भगिनी म्हणजे प्रभात फिल्म कंपनीचे एक भाग्यविधाते विष्णुपंत दामले यांच्याकडं वास्तव्य; म्हणून तेव्हापासून चित्रपटसृष्टीशी अप्रत्यक्ष संबंध.

प्राथमिक शिक्षण कोल्हापूर. पुढील इंटर सायन्सपर्यंत पुणे. १९४४ 'प्रभात'च्या 'रामशास्त्री'पासून प्रमुख सहाय्यक दिग्दर्शक म्हणून चित्रपटसृष्टीशी प्रत्यक्ष संबंध. 'प्रभात'शिवाय अन्य चित्रपट संस्थाच्या चित्रपटांना हीच जबाबदारी. एकूण ७ चित्रपट. केंद्र सरकार व उत्तर प्रदेश सरकारच्या अनुबोधपटांचं दिग्दर्शन.

१९५४पासून वृत्तपत्रं, नियतकालिकं यात सातत्यानं लेखन. विशेषत: देशी-विदेशी चित्रपटसृष्टी व कलावंत. तितकीच वर्ष आकाशवाणीशी संबंध. प्रथम कलाकार म्हणून; नंतर गेली ४२-४३ वर्ष लेखक. आतापर्यंत.

'कथालक्ष्मी' हे स्वत:चं कौटुंबिक मासिक २० वर्ष चालविलं. प्रेस्टीज प्रकाशनच्या 'मयुरपंख' या कलापाक्षिकाचा २ वर्ष संपादक.

चित्रपट, नाट्य नामवंत कलावंताच्या तसंच साहित्यिकांच्या जाहीर मुलाखती. १९६१ महाराष्ट्र राज्य सरकारच्या कथा स्पर्धात प्रथम पारितोषिक. वाईच्या विश्वकोशाच्या चित्रपट विभागाचा लेखक अभ्यागत संपादक. चित्रपटविषयक ठिकठिकाणी व्याख्यानं-पुणे विद्यापीठ, शिवाजी विद्यापीठासह.

'सतीची पुण्याई', 'धाकटी सून' या रौप्य महोत्सवी चित्रपटांचा लेखक, निर्मितीप्रमुख. 'एक होती प्रभातनगरी' ग्रंथाला साहित्य परिषदेचा पुरस्कार. अन्य चार पुस्तकं. १९८६ साली राष्ट्रीय चित्रपट पुरस्कार समितीवर ज्युरी म्हणून निवड.